


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## सत्य .... सिंड्रेला

वर्षानुवर्षं अशीच गेली
पाऊस झेलत, वारा खात
सुंदर, काचेचा बूट हातात
मी सिंड्रेलाच्या शोधात.
खाणाखुणा काहीच नाहीत,
अमुक असा पत्ता नाही.
मनातल्या त्या सिंड्रेलाचं
रुपडं मात्र गवसलं नाही
पहाटेपासून करतो शोध,
संध्याकाळी दमून गोठ
चिक्कार पोरी दिसतात तशा,
सिंड्रेला मात्र दिसत नाही.
काचेचा बूट तसाच राहिलाय
जीव मात्र दमून गेलाय
सिंड्रेला, फक्त मनात असते
ह्या सत्याचा शोध लागलाय

## स्वप्न .... सिंड्रेला

काचेचा घेऊनीया बूट
सिंड्रेलाला शोधत सूट
अशीच गेली वर्षं काही
मी सिंड्रेला शोधत राही
आता झाली किती दुकाने
त्याच नक्षीची पादत्राणे
कचकड्याच्या सिंड्रेलांचे
पायी होते तसेच बूट
औटघडीच्या युवराजाच्या
नाचावरचे प्रेम अतूट
मध्यरात्रीच्या टोलांसंगे
सर्वांचे पण स्वप्न भंगे
कवटाळे मी जुनाच बूट
मनात करूनी जुनाच चंग
माझ्या मनीच्या सिंड्रेलाचे
प्रेम, प्रतिमा असे अभंग

शेल सिल्व्हर्टन (१९३०-१९९९) या नावाजलेल्या अमेरिकन कलावंताने लहान मुलांसाठी गाणी व कविता लिहिल्या व त्या अतिशय लोकप्रिय झाल्या.

त्यातील काही कवितांवर आधारीत, संतोष शिंत्रे आणि जयंत गाडगीळ यांच्या 'शेलक्या कविता' या संग्रहातील काही कविता आम्ही दरमहा प्रसिद्ध करणार आहोत. या अंकात दोन कविता दिल्या आहेत.

- संपादक

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६२ । अंक ९ । जून २००९
ज्येष्ठ/आषाढ शके १९३१
वार्षिक वर्गणी ३०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २५/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).



अनुक्रमणिका






# नवभारत

जून २००९

अनुक्रमणिका



(मुखपृष्ठ : श्री. देवीदास बागुल यांनी आपल्या कॅमेऱ्याने टिपलेला 'शाल्मली : एक दिल सौ अफसाने' या चित्राचे रसग्रहण करणारा श्री. बागुल यांचा लेख या अंकातच वाचावा.)

# साहित्यसंशोधन आणि साहित्यसमीक्षा

प्रा. रत्नाकर बापूराव मंचरकर

### ०१. शिक्षण, समीक्षा आणि संशोधन

संशोधनाची संकल्पना आपण विषयनिरपेक्ष पद्धतीने येथवर समजून घेतली. आता साहित्य-संशोधनाचा समीक्षेच्या संदर्भात विचार करणार आहोत.

शिक्षण आणि संशोधन यांचा अविभाज्य संबंध असतो. येथे साहित्याच्या संदर्भात या संबंधाचा थोडा उलगडा करता येईल. संगीत, चित्र, नृत्य इत्यादी कलांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांचे उद्दिष्ट संगीतकार, चित्रकार, नर्तक होणे हे असते. तथापि साहित्याच्या विद्यार्थ्यांचे उद्दिष्ट साहित्यिक होणे, असे मानले जात नाही. साहित्याची जाण येणे हेच वाङ्मयाच्या अध्यापनाचे उद्दिष्ट मानले जाते. विद्यार्थ्याला साहित्याच्या आस्वादाकडून मूल्यमापनाकडे कसे जावे हे कळले पाहिजे. त्यासाठी साहित्याकडे एका ऐतिहासिक आणि तात्त्विक परिप्रेक्ष्यातून कसे पाहावे हेच आपण त्याला शिकवीत असतो. विद्यार्थी साहित्यिक नसला तरी साहित्यसमीक्षक बनला पाहिजे;[१] असाच आपल्या भाषासाहित्यांच्या अभ्यासक्रमाचा रोख आहे.

साहित्यशिक्षणाचे उद्दिष्ट समीक्षेतील प्रावीण्य हे असेल तर ते अधिक कसे वाढेल त्याची चिंता आपण केली पाहिजे. त्यासाठी समीक्षेला संशोधनाची जोड द्यायला हवी. समीक्षेला शोधमूल्य कसे येईल ते पाहिले पाहिजे.

'संशोधन' आणि 'समीक्षा' या दोन्ही व्यापक संकल्पना आहेत. नैसर्गिक शास्त्रे, सामाजिक शास्त्रे आणि साहित्यासारख्या कला इत्यादी निरनिराळ्या क्षेत्रात या दोन्ही संकल्पना वापरल्या जातात. तेव्हा अभ्यासक्षेत्रांच्या दृष्टीने या दोन्ही संकल्पना व्यापक आहेत.

'संशोधन' आणि 'समीक्षा' या दोन्हींच्याही वेगवेगळ्या पद्धती आहेत. सैद्धांतिक आणि उपयोजित अशी अंगे आहेत. निरनिराळ्या दृष्टिकोणांनी त्यांचा वापर केला जातो.

याशिवाय एका विषयातील तत्त्वांचा, शोधपद्धतींचा दुसऱ्या विषयात काही प्रमाणात वापर केला जातो. असा वापर करावा की करू नये हा एक वादाचा विषय आहे. तथापि त्यामुळे या दोन संकल्पनांचा विचार अधिक गुंतागुंतीचा बनतो.

येथे 'संशोधन' आणि 'समीक्षा' यांचा विचार आपण साहित्यक्षेत्रापुरता मर्यादित असा करणार आहोत. त्याचप्रमाणे मराठीमध्ये झालेले साहित्यसंशोधन आणि साहित्यसमीक्षा यांच्या संदर्भात तो करणे अधिक योग्य ठरेल. त्यासाठी आधी आपण साहित्यसंशोधनाचे स्वरूप लक्षात घेऊ.

### ०२. साहित्यसंशोधनाचे वेगळेपण

भौतिक शास्त्रे, सामाजिक शास्त्रे आणि साहित्य यांची संशोधन-प्रक्रिया मूलतः सारखीच असते. पण त्यांच्या अभ्यासविषयाचे स्वरूप, उद्दिष्ट, पद्धती व कार्यवाही यामुळे त्यात वेगळेपणाही येतो.

### ०२.१ भौतिक शास्त्रातील संशोधन

पदार्थविज्ञान, रसायन यासारखी प्राकृतिक विज्ञाने आणि प्राणीशास्त्र, वनस्पतीशास्त्र यासारखी जैव विज्ञाने यांचा भौतिक शास्त्रात समावेश होतो. जीवसृष्टी आणि निसर्गसृष्टी यांची यंत्रणा जाणून घेणे आणि अधिक उपयुक्त होईल अशा रीतीने तिच्यात बदल घडवून आणणे; हा भौतिक शास्त्रांचा विषय असतो. याविषयीचे संशोधन मुख्यतः प्रयोगशाळेत नियंत्रित परिस्थितीत केलेल्या प्रयोगांच्या द्वारे केले जाते. स्रोताजवळ मिळणारी विश्वसनीय व अस्सल माहिती (फर्स्ट हँड इनफॉर्मेशन ॲट द सोअर्स) त्यात उपलब्ध

अनुक्रमणिका

होते. ही माहिती जेवढी नेमकी, अचूक व संपूर्ण मिळते तेवढे निष्कर्ष बिनचूक येतात. प्रयोगरूपाने मिळणाऱ्या माहितीचे विश्लेषण-संश्लेषण करून एकाच अनुमानाला सिद्धांताची पातळी प्राप्त होऊ शकते. भौतिकशास्त्रात एकाच माहितीवरून दोन भिन्न निष्कर्ष काढता येत नाहीत. संशोधनाने प्राप्त होणारे नवे ज्ञान त्यापूर्वीच्या जुन्या ज्ञानाला बाधित करते. टॉलेमी-कोपर्निकस-केप्लर-गॅलिलिओ-न्यूटन-आइनस्टाइन-हॉयेल-नारळीकर यांचे संशोधन क्रमाने लक्षात घेतले तर पृथ्वी आणि विश्व यांच्या संबंधाविषयीचे आपले ज्ञान कसे बदलत गेले; याची कल्पना येईल.

### ०२.२ सामाजिक शास्त्रातील संशोधन

इतिहास, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र ही साधनप्रधान शास्त्रे आणि मानसशास्त्र, समाजशास्त्र ही वर्तनवादी शास्त्रे सामाजिक शास्त्रांमध्ये समाविष्ट होतात. माणूस आणि समाजव्यवस्था यांच्या परस्परसंबंधांचा अभ्यास हा त्यांचा विषय असतो. सामाजिक संरचनेचे वास्तव तत्त्वरूपाने जाणणे आणि एखाद्या वास्तव समस्येचा अभ्यास करून तिच्यावर उपाययोजना सुचविणे, हा त्यातील संशोधनाचा उद्देश असतो. हे संशोधन मुख्यतः क्षेत्रीय संशोधन असते. ते समाजव्यवहाराच्या प्रत्यक्ष प्रवाहात राहून करावे लागते. माणूस आणि समाज यांचे हे अभ्यासक्षेत्र सतत बदलणारे असते. त्यामुळे अवलोकन, निरीक्षण यांच्या अचूक नोंदी करणे अवघड होते. संशोधन हाही प्रयोगविषयाचा भाग असतो. संशोधकाप्रमाणेच, प्रयोगविषयालाही स्वतःचे व्यक्तिमत्त्व असते. सर्वेक्षण, प्रश्नावली, मुलाखती, व्यष्टी इतिहास इत्यादी साधने वापरून सामग्री संकलित करावी लागते. सामग्री संकलनात पुष्कळ वेळा इतरांवर अवलंबून राहावे लागते. कमी वेळात मोठ्या क्षेत्राचे सर्वेक्षण करावे लागते. त्यामुळे मिळणाऱ्या माहितीची विश्वसनीयता वारंवार पडताळून पहावी लागते. सामाजिक शास्त्रातील समस्या एकाच वेळी अनेक घटकांशी संबंधित असतात. त्यांचे आकलन व उपाय हे दोन्हीही काहीसे अस्पष्ट व अनुमानात्मक राहण्याची शक्यता असते. एका विशिष्ट स्थलकालातील समाजाचे प्रश्न असे होते व त्यांची उत्तरे अशी होती, एवढेच सांगणे शक्य असते. भौतिक शास्त्रांच्या तुलनेने सामाजिक शास्त्रे अर्वाचीन आहेत. सामाजिक शास्त्रातील निर्णय निश्चित, काटेकोर, अचूक व निरपवाद असत नाहीत. त्यांच्यात तितकी वस्तुनिष्ठाही येऊ शकत नाही. पण संशोधकांना तसा प्रयत्न मात्र करावा लागतो. सामाजिक शास्त्रातील संशोधनाचे स्वरूप बह्वंशी वर्णनपर, समालोचनात्मक असते. ते व्यवहार्य व उपयुक्त असावे लागते. सामाजिक शास्त्रामध्ये एकाच माहितीवरून वेगवेगळे अर्थ निष्पन्न होतात. त्यामुळे त्यातील संशोधनाने उपलब्ध होणारे नवे ज्ञान जुन्या ज्ञानाला पूर्णपणे बाधित करू शकत नाही.

### ०२.३ साहित्यसंशोधन :

वाङ्मय ही संज्ञा व्यापक आहे. सर्व प्रकारच्या लिखित व मौखिक भाषिक आविष्कारासाठी 'वाङ्मय' ही संज्ञा त्याच्या मूलार्थाने वापरली जाते. 'जे वाणीमय आहे ते' हा 'वाङ्मय' या संज्ञेचा मूलार्थ आहे. वाङ्मय जेव्हा काव्य, कथा, कादंबरी, नाटक अशा प्रकारचे सर्जनशील असते तेव्हा त्यास 'ललित वाङ्मय' असे म्हणतात. वाङ्मय जेव्हा निबंध, चरित्र, समीक्षा इत्यादी वैचारिक वळणाचे किंवा माहितीपर असते तेव्हा त्याला 'ललितेतर वाङ्मय' म्हणतात. ललित वाङ्मय या संज्ञेचा पर्याय म्हणून 'साहित्य' ही संज्ञा जणू राखून ठेवलेली होती. 'वाङ्मया'च्या तुलनेने तिची अर्थकक्षा सर्जनशील लेखनापुरतीच मर्यादित होती. ललित वाङ्मय तथा साहित्य हे कलारूप असते. निबंधादी ललितेतर वाङ्मय शास्त्राला जवळचे असते. साहित्याचा आस्वाद, आकलन व मूल्यमापन करण्याचे काम साहित्यसमीक्षा करते. त्यासाठी समीक्षा ज्या संकल्पना, निकष, तत्त्वे व सिद्धांत यांचा आधार घेते त्यांची सुव्यवस्थित मांडणी ज्या शास्त्रात केली जाते त्यास साहित्यशास्त्र किंवा साहित्यमीमांसा म्हणतात. अलीकडे 'साहित्य' ही संज्ञा या सर्वांचा समावेश करणाऱ्या सामान्य अर्थाने वापरलेली दिसून येते. ग्रामीण साहित्य, दलित साहित्य, लोकसाहित्य, तौलनिक साहित्य अशा शब्दप्रयोगामध्ये येणारी 'साहित्य' ही संज्ञा

अशा सर्वसमावेशक अर्थाने आलेली दिसते. या बदललेल्या अर्थकक्षेने मीही 'साहित्यसंशोधन' यातील 'साहित्य' ही संज्ञा 'वाङ्मय' या संज्ञेशी समकक्ष अशा अर्थाने वापरीत आहे. 'साहित्या'च्या या सर्व अंगामध्ये 'साहित्यसंशोधना'ला अवसर असतो.

साहित्यकृतींच्या संहिता, लेखक-वाचक, साहित्यिक घटिते आणि साहित्याचे सामाजिक – सांस्कृतिक संदर्भक्षेत्र या सर्वांनी मिळून घडणारा साहित्यव्यवहार हा साहित्यसंशोधनाचा विषय असतो. तरीही साहित्यकृतीचे जीवनवेधाचे सामर्थ्य आणि सौंदर्य हेच त्याचे केंद्र असते. साहित्यसंशोधन हे क्वचित प्रायोगिक किंवा क्षेत्रीय स्वरूपाचे असू शकते पण ते मुख्यतः ग्रंथालयात बसून करावे लागते. साहित्यसंहिता हीच त्याची सामग्री असते पण त्या सामग्रीचा अन्वयार्थ लावण्याला त्यात अधिक महत्त्व असते.

विज्ञान, सामाजिक शास्त्रे, कला अशा अनेक क्षेत्रात संशोधन केले जाते. ते तात्त्विक पातळीवरील शुद्ध व सैद्धांतिक स्वरूपाचे असते. त्याचप्रमाणे सिद्धांतांचा व्यवहाराशी मेळ घालणाऱ्या उपयोजित स्वरूपाचेही असते. प्रायोगिक, तार्किक, वर्णनात्मक, ऐतिहासिक अशा अनेक पद्धतींनी ते केले जाते. त्यामागे वेगवेगळे दृष्टिकोण असतात.

विज्ञान आणि सामाजिक शास्त्रे यांच्या स्वतःच्या अशा स्वतंत्र अभ्यासपद्धती आहेत. साहित्यसंशोधनाची अशी स्वतंत्र अभ्यासपद्धती आपण अजून निश्चित करू शकलेलो नाही. साहित्याची सर्जनशीलता, त्याची व्यक्तिप्रधानता, उत्स्फूर्तता, त्यामागील मनोव्यापाराची गूढता, साहित्याच्या अस्तित्वाचे स्वरूप, त्याचा वाचकाच्या मनावर होणारा परिणाम यामुळे इतर क्षेत्रातील संशोधनापेक्षा साहित्यसंशोधन निराळे ठरते.

साहित्याची मुळे समाज, मानसशास्त्र, धर्म, तत्त्वज्ञान, लोककला अशी सर्वदूर पसरलेली आहेत. साहित्याचा विषय 'स्फुरत पसरला विश्वामाजी' असा वाढता वाढता वाढतच जातो. साहित्य जीवनाच्या सर्वांगांना या ना त्या तऱ्हेने स्पर्श करते. साहित्याच्या या अनेकांगी स्वरूपामुळे साहित्याचा अभ्यास हा एका परीने जीवनाचा अभ्यास होतो. इतर शास्त्रांची विषयाला अनुसरून व्याख्या करता येते. तशी साहित्याची विषयानुरूप व्याख्या करता येत नाही. त्यामुळे साहित्याच्या अभ्यासाची विशिष्ट अशी संशोधनपद्धती निश्चित करता येत नाही.

वैज्ञानिक संशोधन पद्धतीत नवे ज्ञान जुन्या ज्ञानाला बाधित करते. त्यात एका वेळी एकच गोष्ट सत्य असू शकते. हे तत्त्व साहित्यसंशोधनात पाठचिकित्सेचे क्षेत्र सोडल्यास इतरत्र लागू पडत नाही. साहित्य हे स्वभावतः वादग्रस्त असलेल्या संकल्पनांचे क्षेत्र आहे त्यामुळे त्यात एकाच वेळी परस्परविरोधी सत्यांचे सह अस्तित्व असू शकते.

साहित्य जीवनाच्या सर्वांगाला या ना त्या प्रकारे स्पर्श करते. साहित्याच्या अनेकांगी स्वरूपामुळे त्याची अशी विशिष्ट संशोधनपद्धती ठरविता येत नाही.

साहित्यसंशोधनाची स्वतंत्र व स्वतःची अशी खास पद्धती नाही. त्यामुळे साहित्यसंशोधनासाठी इतर शास्त्रांतील शोधपद्धतींचा वापर करावा लागतो. कोणत्याही एका विषयातील तत्त्वे आणि पद्धती दुसऱ्या विषयासाठी बहुधा जशाच्या तशा वापरता येत नाहीत. त्या त्या विषयक्षेत्राच्या गरजेप्रमाणे या पद्धती संस्कारित स्वरूपात वापराव्या लागतात. साहित्याचा अभ्यास करताना असे करावे लागते. किंबहुना इतर विषयांतील शोधपद्धती साहित्यनुलक्ष्यी पद्धतीने कौशल्याने वापरणे, हीच साहित्यसंशोधनाची पद्धती म्हणावी लागते.

साहित्यसंशोधनासाठी कोणतीही एक पद्धती यांत्रिकपणे वापरता येत नाही. साहित्याला अनेक पैलू आणि परिमाणे असतात. त्यामुळे साहित्यसंशोधन करताना एकापेक्षा अधिक पद्धतींचा परस्परपूरक वापर करणे अधिक फलदायी ठरते. आशयसूत्रात्मक पद्धतीने साहित्याचा अभ्यस करताना समाजशास्त्रीय पद्धतीची जोड देणे उपकारक ठरू शकते. 'दलित साहित्य : प्रवाह आणि प्रतिक्रिया' हे आणि "दलित साहित्य : सामाजिक आणि सांस्कृतिक अभ्यास" गो. म. कुलकर्णी – विद्याधर पुंडलिक यांची पुस्तक यादृष्टीने पाहण्यासारखी आहेत.

अनुक्रमणिका






### ०२.४ साहित्यसंशोधानाची परिक्षेत्रे

साहित्यकृतीचे चार महत्त्वाचे संबंध असतात. ते पुढील आकृतीद्वारे दाखविता येतात.




या सर्व संबंधांच्या अभ्यासात समीक्षेला संशोधन साहायक ठरते.

अशा साहित्याच्या शोधसमीक्षेला ज्याचे साहाय्य घ्यावे लागते ती साहित्यसंशोधनाचीही परिक्षेत्रे ठरतात. ती पुढील आकृतीद्वारे दाखविता येतील.




साहित्याचे संबंध लक्षात घेऊन साहित्य-संशोधनाच्या परिक्षेत्रांचे अगदी थोडक्यात दिग्दर्शन करणे, एवढेच येथे शक्य आहे.

साहित्यकृती आणि लेखक यांच्या संबंधांचा शोध घेणे आणि त्याच्या साहित्यकृतीवर नेमका कोणता परिणाम झाला हे आजमावणे; असे साहित्यकृतीच्या निर्मितीच्या अंगाने संशोधन करता येते. यात लेखकाची स्थलकालनिश्चिती आणि रचना कर्तृत्वाची निश्चिती करावी लागते. लेखकाची जडणघडण, व्यक्ती म्हणून त्याचा जीवनप्रवास, त्याचे व्यक्तिमत्त्व, त्याची जीवनदृष्टी, त्याची कलादृष्टी यांचा शोध घ्यावा लागतो. लेखकाचे जीवन आणि त्याचे साहित्य यांच्या परस्परसंबंधांचा वेध घ्यावा लागतो; चरित्रात्मक पद्धतीने किंवा ऐतिहासिक पद्धतीने असा शोध घेता येतो. लेखकाप्रमाणेच साहित्यकृतीचे चरित्रही येथे शोधता येते, साहित्यकृतीमागील प्रेरणा-प्रयोजन कोणत्या होत्या, तिचे स्फुरण कसे झाले, लेखन कोठे व केव्हा झाले, असे प्रश्नही संशोधक ठरतात.

साहित्यकृती आणि वाचक यांच्या संबंधाचा शोध घेणे आणि साहित्यकृतीने वाचकांच्या पिढ्यांवर कोणता व कसा परिणाम केला हेही पाहावे लागते. हे साहित्यकृतीच्या आस्वादाच्या अंगाने करावयाचे संशोधन होय. वाचकाची सामाजिक जडणघडण, अभिरूची, अपेक्षा यांचा साहित्यावर होणारा परिणाम, साहित्यकृतीला वाचकांनी दिलेला प्रतिसाद, त्यातील चढउतार, साहित्यकृतीचे प्रकाशन, तिच्या आवृत्त्या, तिला मिळालेले पुरस्कार किंवा तिच्यावर आलेली बंदी, तिच्यानिमित्त निर्माण झालेले विविध वाद अशा सर्वांविषयीचा शोध येथे घेता येतो. हा शोध घेताना वाचक-प्रतिसाद आणि मानसशास्त्रीय या पद्धतींचा मानसपरिणामांच्या अंगांनी उपयोग होतो. मार्क्सवादी आणि समाजशास्त्रीय या पद्धतींचा सामाजिक अंगांनी शोध घेताना उपयोग होतो.

साहित्यकृती आणि समाज यांच्यातील देवाणघेवाण हाही साहित्यसंशोधनाचा विषय आहे. त्यासाठी सामाजिक संरचना, मूल्ये, कल्पना, परंपरा, निर्मितीकालीन परिस्थिती जाणून घ्यावी लागते. त्याद्वारे समाजाचा साहित्यकृतीवर होणारा परिणाम आजमावता येतो. साहित्यकृतीचाही समाजावर परिणाम होत असतो. साहित्यकृती सामाजिक स्थितिशीलतेला पोषक आहे की परिवर्तनाकडे संकेत करणारी आहे; हे शोधावे लागते. साहित्यकृती आणि वाचक किंवा समाज ही दोन्ही क्षेत्रे आरंभी वेगळी असली तरी अखेरी एकमेकात मिसळणारी आहेत.

साहित्यकृतीचा स्वतःशी असलेला संबंध हा वाङ्मयीन दृष्टीने एक महत्त्वाचा संबंध आहे. संहितेची उपलब्धी हेही काही वेळा संशोधन ठरू शकते. संहितांचा

धांडोळा घेणे हे संशोधनाचे एक अंग आहे. कधी परंपरेत प्रवाहित असलेल्या मौखिक संहिता त्या त्या ठिकाणी फिरून गोळ्या कराव्या लागतात. संहितानिश्चिती करताना संहिताचिकित्साशास्त्राचा आधार घ्यावा लागतो. हेही संशोधनाचे स्वतंत्र क्षेत्र आहे. साहित्यकृतीचे विविध घटकांमध्ये विभाजन करून तिचे विश्लेषण करावे लागते. त्याचप्रमाणे या घटकांचे संश्लेषण करून घटक व संपूर्ण यांच्या संबंधांचा शोध घेता येतो. साहित्यकृतीचे आशयविश्लेषण आणि अर्थनिर्णयन करावे लागते. त्याचप्रमाणे साहित्यकृतीच्या संरचनेचे विश्लेषण करावे लागते. रूपवादी दृष्टिकोणानुसार साहित्यकृतीचे आकलन व मूल्यन करण्यास एवढे पुरेसे आहे. त्याद्वारे आपण साहित्यकृतीचा अंतर्वेध घेऊ शकतो. हा अभ्यास समीक्षेच्या क्षेत्रात अधिक येतो. येथे संशोधनाचे अत्यल्प साहाय्य होऊ शकते.

साहित्यविषयीच्या लौकिकवादी दृष्टिकोणानुसार साहित्यकृतीचा अभ्यास एवढ्यावरच संपत नाही. त्यात आणखीही काही अभिप्रेत असते. त्याद्वारे आपण साहित्यकृतीचे बाह्य संदर्भ स्पष्ट करू शकतो. साहित्यकृती आणि साहित्यप्रकार, साहित्यपरंपरा, जीवनक्षेत्रे यांच्या संबंधांचा वेध घेणे यादृष्टीने आवश्यक ठरते. अशा शोधात समीक्षेच्या जोडीने साहित्याचे संशोधनही साहाय्यक ठरते. त्यासाठी अन्य शास्त्रांचा व्यासंग आणि ललित कलांची जाणकारी उपयुक्त ठरते.

साहित्यकृती आणि साहित्यमीमांसा यांचे संबंध शोधताना साहित्यकृती साहित्यमीमांसेच्या कसोटीवर कितपत उतरते हे पहावे लागते. याचाच दुसरा भाग असा की साहित्यकृतीमुळे साहित्यमीमांसेच्या व्यवस्थेत काही बदल होतात काय, ते पाहणे. हेही संशोधन आणि समीक्षा यांचे जोडक्षेत्र आहे.

साहित्यकृती आणि कालतत्त्व यांचा संबंध शोधणेही महत्त्वाचे असते. कालतत्त्वाचा साहित्याच्या निर्मितीवर आणि आस्वादावर होणारा परिणाम शोधावा लागतो. त्या त्या मौखिक किंवा ग्रांथिक परंपरेत त्या साहित्यकृतीचे स्थानांकन करावे लागते. साहित्यकृतीच्या अस्तित्वामुळे इतिहासव्यवस्थेत काही बदल करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे का, हेही पहावे लागते.

साहित्यकृती आणि भाषा हे शोधसमीक्षेचे एक महत्त्वाचे अंग आहे. ऐतिहासिक भाषाविज्ञानाने पुरविलेल्या कालनिष्ठ भाषिक निकषांच्या आधारे एखाद्या रचनेच्या कालनिश्चितीवर संशोधकाला प्रकाश टाकता येतो.

भाषेवर जीवनाचे ठसे उमटलेले असतात. एखादा लेखक अनेकस्तरीय भाषा वापरून त्या जीवनाला आपल्या साहित्यकृतीत सुरक्षित ठेवतो. त्याच्या शब्दार्थांचे दोर धरून एखादा संशोधक त्या संस्कृतीला प्रकाशित करू शकतो. त्याचा साहित्याच्या आकलनाला उपयोग होऊ शकतो.

साहित्यकृतीतील सौंदर्याची प्रतीती तिच्या भाषिक विश्लेषणातून येते. हा साहित्यसमीक्षेचा प्रांत आहे.

गतकालीन किंवा समकालीन लेखकांना कोणकोणते भाषिक पर्याय उपलब्ध होते? त्यातून त्यांनी कशाची निवड केली? त्यामागे त्यांची काय भूमिका होती? ती त्यांना कितपत निभावता आली? निरनिराळ्या लेखकांनी भाषेचा वापर कितपत सौंदर्यानुलक्ष्यी संवेदनशीलतेने केला? त्यांच्यात कोणते साम्य-भेद आहेत? एखाद्या साहित्यप्रकाराची म्हणून ठरीव शैली दिसते का? युगशैली म्हणून त्या त्या कालखंडात दाखवता येते का? यासारख्या प्रश्नांचा शोध साहित्याचा इतिहासकार घेत असतो.

भाषेच्या या सर्व प्रकारच्या अभ्यासात संशोधन कमी अधिक प्रमाणात वाटावे लागते. कधी आंतरविद्याशाखीय साहित्यसंशोधन करावे लागते.

साहित्यसंशोधनाला तौलनिक अभ्यासाचे एक परिमाण असते. भाषांतर किंवा रूपांतर याची मूळ कृतीशी तुलना करावी लागते. एखाद्या साहित्यकृतीचा आधार घेऊन इतर साहित्यकृती कधी जन्म घेताना दिसतात. अशा वेळीही आधारित कृतीची मुळाशी तुलना करावी लागते. साहित्यकृतीची स्वीकृती आणि तिचा प्रभाव हे तर खास तौलनिक अभ्यासाचे क्षेत्र आहे. याशिवाय आतापर्यंत केलेल्या परिक्षेत्रांची परभाषेतील

सदृश परिक्षेत्रांशीही तुलना करता येईल. अशाप्रकारे तुलनेच्या सर्वसंचारी अभ्यासात संशोधनाची वेळोवेळी मदत घ्यावी लागते.

साहित्यसंशोधनाचे वेगळेपण, स्वरूप, पद्धती व परिक्षेत्रे यांची ओळख करून घेतल्यावर आपण साहित्यसमीक्षेची ओळख करून घेऊ.

## ०३ साहित्यसमीक्षेचे स्वरूप

### ०३.१ व्याप्ती

साहित्याविषयी केवळ आत्मगत प्रतिक्रिया स्वच्छंद स्वरूपात प्रकट करण्यापासून तो साहित्य-शास्त्रातील घोटीव कसोट्या काटेकोरपणे वापरण्यापर्यंत अनेकपरी, प्रकार व पद्धती यांचा समीक्षेत समावेश होताना दिसतो. 'एनी इंटिलिजंट डिस्कशन ऑफ लिटरेचर' हे समीक्षेविषयीचे एक मत आहे. व्यवहारातही तसाच अनुभव येतो.

विद्यापीठाच्या उच्च स्तरावरून वाङ्मयाचा अभ्यास सुरू होऊन ऐंशी वर्षे उलटली आहेत. आता तरी वाङ्मयाविषयीचे आणि वाङ्मयासंबंधीचे सर्व प्रकारचे लेखन म्हणजे समीक्षा ही समजूत बदलावयास हवी. साहित्याच्या अभ्यासाचे विशेषीकरण करावयाचे तर चार उपक्षेत्रे कल्पिणे श्रेयस्कर ठरते.

साहित्याची तत्त्वे, त्याचे प्रकार, त्याच्या कसोट्या यांचे शोधन, चिकित्सा आणि व्यवस्थापन करणारे क्षेत्र साहित्यमीमांसेचे होय.

ऐतिहासिक प्रक्रियेचे अखंडित भाग म्हणून एखाद्या भाषेत निर्माण झालेल्या साहित्यकृतींची कालसंगत मांडणी करणारे क्षेत्र साहित्येतिहासाचे होय. प्रत्यक्ष साहित्यकृतींचा अभ्यास करणे साहित्यसमीक्षेचे क्षेत्र होय. याशिवाय साहित्य, जीवन आणि साहित्यव्यवहार यांच्या संबंधाचे क्षेत्र म्हणजे साहित्यविद्येचे क्षेत्र होय.

असा नेमका भेद मराठी साहित्यव्यवहारात पुरेसा रुळलेला नाही. त्यामुळे साहित्यमीमांसा आणि साहित्यसमीक्षा या दोन क्षेत्रांचा 'समीक्षा' असाच उल्लेख पुढील विवेचनात केलेला आहे.

साहित्यकृतींच्या अभ्यासातून साहित्यामध्ये असलेल्या व्यवस्था शोधणे आणि मांडणे म्हणजेच साहित्यमीमांसा किंवा तात्त्विक समीक्षा होय. ही साहित्यविषयक संकल्पना, साहित्यतत्त्वे, सूत्रे आणि सिद्धांत यांची चर्चा–चिकित्सा करते.

तात्त्विक समीक्षेने पुरविलेल्या साहित्य-तत्त्वांच्या कसोटीवर प्रत्यक्ष साहित्यकृतींचा अंतर्वेध घेणारी आणि त्यांचे बाह्यसंदर्भ शोधणारी समीक्षा ती उपयोजित समीक्षा होय. या समीक्षेचे क्षेत्र कमी-अधिक असू शकते. ती एकाच साहित्यकृतीची समीक्षा असू शकते. तशी एका लेखकाच्या सर्व साहित्यकृतींचीही समीक्षा असू शकते. एखाद्या भाषेतील एखाद्या साहित्यप्रकारात निर्माण झालेल्या साहित्यकृतींची ती प्रकारनिष्ठ समीक्षा असते. याचप्रमाणे एखाद्या कालखंडात निर्माण झालेल्या सर्व प्रकारच्या वाङ्मयाचीही ती समीक्षा असू शकते. त्याचप्रमणे दोन किंवा अधिक भाषापरंपरांमधील साहित्यांची ती तौलनिक समीक्षाही असू शकते. समीक्षेच्या बहुतेक व्याख्यांमध्ये ही समीक्षा डोळ्यासमोर ठेवूनच चर्चा केलेली आढळते. आपणही या प्रकारच्या समीक्षेला मध्यवर्ती ठेवून तिच्या स्वरूपाचा विचार करू.

टीका, छाया, भाष्य, अनुवाद, अभिप्राय, परामर्श, रसग्रहण, परीक्षण, समीक्षण हे समीक्षेसाठी आपल्या परंपरेत वापरले जाणारे शब्द साहित्यकृतीच्या समीक्षेकडे लक्ष वेधतात; तर 'मीमांसा', हा आणखी एक वापरला जाणारा शब्द तात्त्विक समीक्षेकडे निर्देश करतो. त्यामुळे आपल्या परंपरेतही समीक्षेची हीच व्याप्ती प्रस्तुत आहे, असे म्हणता येते.

### ०३.२ कलारूप समीक्षा

साहित्याचे क्षेत्र हे स्वभावतः वादग्रस्त संकल्पनांचे क्षेत्र आहे. त्यामुळे कोणत्याही मुद्यावर त्यात मतैक्य कमी आणि मतभेद जास्त, अशी स्थिती असते. समीक्षेचे स्वरूपही त्यास अपवाद नाही.

त्यापैकी एक भूमिका समीक्षेला कलारूप मानणारी आहे. साहित्यकृतीचा रसिकाच्या मनावर अंकित झालेला ठसा आणि त्यामुळे उत्पन्न होणारे

प्रतिसाद हे संस्कारवादी (इंप्रेशनिस्टिक) समीक्षेचे स्वरूप असते. कलाकृतीच्या अनुभवाचा अनुभव समोर ठेवणे हेच तिचे उद्दिष्ट असते. विज्ञान आपल्याला एकच एक ज्ञान देते; पण कला मात्र व्यक्तिगणिक वेगवेगळ्या प्रतिक्रिया निर्माण करते. ही साहित्यकृती कशाप्रकारे मला प्रभावित करते, ती कोणत्या संवेदना मला देते, एवढेच मी तिच्याविषयी सांगू शकतो. दुसरे वाचक दुसऱ्या संवेदना मिळवतील व दुसऱ्या पद्धतीने व्यक्त करतील. अशी कलारूप समीक्षेमागील भूमिका असते. हे व्यक्तीकरण साहित्यकृतीने दिलेल्या अनुभवाचे असल्याने तेही कलेचे रूप धारण करते.

साहित्यकृतीच्या संहितेचा अनुभव हीच कलात्मसमीक्षेची अभ्याससामग्री असते. समीक्षकाची भूमिका येथे आस्वादक कर्त्याची असते. आस्वाद घेणे हेच त्याचे काम असते. साहजिकच या प्रक्रियेचे स्वरूप स्वैर, उन्मुक्त, नियमरहित आणि भावप्रेरित असते. त्यामुळे ही समीक्षा आत्मनिष्ठ (सब्जेक्टिव्ह), कल्पकताप्रधान (इमॅजिनेटिव्ह), काव्यात्म (पोएटिक) आणि आस्वादक (ॲप्रिशिएटिव्ह) होते. साहित्यकृतीने दिलेला सौंदर्यप्रत्यय ती पुन्हा उभा करते, त्यामुळे तिची समीक्षा मूळ साहित्यकृतीची पुनर्निर्मिती (रि-क्रिएशन) ठरते.

कलारूप समीक्षा अतिरिक्त स्वरूपात व्यक्तिनिष्ठ होण्याची शक्यता असते. ती एका कलाकृतीचे दुसऱ्या कलाकृतीत केलेले रूपांतर ठरते; ते द्वितीय सर्जन असते. ते एका परीने अनावश्यक असते. निदान दुय्यम असते. अनेकांच्या मताने साहित्यकृतीच्या द्वारे एखाद्या व्यक्तीमध्ये उत्पन्न झालेले भावभावनांचे आवेग व्यक्त करणारी अशी समीक्षा ही व्याजसमीक्षा असते. संशोधनाशी तिचा संबंध अतिशय दूरचा असल्याने ही कलारूप समीक्षा येथे बाजूला ठेवलेली आहे.

### ०३.३ शास्त्ररूप समीक्षा

साहित्याची समीक्षा म्हणजे दुसरी निर्मिती नव्हे. ती एक बौद्धिक व गुंतागुंतीची प्रक्रिया आहे. साहित्य सर्जनशील आहे, तर त्याचा अभ्यास हा ज्ञानसंपादनाचा एक प्रकार आहे. या दोन्ही गोष्टी एका व्यक्तीत असू शकतात, पण त्या एक नव्हेत. समीक्षकाला आपला साहित्यकृतीचा अनुभव बौद्धिक भाषेत ग्रथित करता आला पाहिजे. तो संगतवार व तर्कशुद्ध पद्धतीने व्यक्त करता आला पाहिजे. यादृष्टीने "वस्तुनिष्ठ निकषांवर आधारलेला आणि यथोचित शब्दांमध्ये प्रकट होणारा साहित्यविषयक मूल्यगर्भ अभिप्राय म्हणजे समीक्षा होय"[३] ही गंगाधर पाटील यांनी केलेली समीक्षेची व्याख्या योग्य वाटते.

अशी समीक्षा शास्त्ररूप असते. आकलन, आस्वाद, मूल्यमापन आणि शब्दांकन अशी तिची चार अंगे आहेत. त्यांच्याद्वारे साहित्यकृतीचा अंतर्वेध घेतला जातो आणि बाह्यसंदर्भ शोधले जातात.

आकलन म्हणजे साहित्यकृती पूर्णपणे समजून घेणे. विश्लेषण, संश्लेषण आणि अर्थान्वेषण (अर्थनिर्णयन) या क्रियांनी साहित्यकृतीचे आकलन करून घेता येते.

शब्द, वाक्य, प्रतिमा, भावना, विचार, संवेदना, कल्पना, कथानक, पात्रे, निवेदन, आशयसूत्रे इत्यादी साहित्यकृतीचे घटक असतात. हे घटक सुटे करणे म्हणजे विश्लेषण होय. विश्लेषणात घटक सुटे करून ते समजून घेण्याबरोबरच एका घटकाचा दुसऱ्या घटकाशी असलेला संबंधही समजून घ्यावा लागतो.

साहित्यकृतीच्या अर्थाचे सौंदर्यपूर्ण दृष्टीने केलेले विवरण आणि स्पष्टीकरण म्हणजे अर्थनिर्णयन होय. साहित्यकृतीचा अर्थ तिच्या संहितेतच असतो असे मानून केलेले ते स्वायत्त अर्थनिर्णयन होय. साहित्यकृतीचा अर्थ बाह्यसंदर्भाच्या साहाय्याने शोधणारे ते प्रतीकमुखी अर्थनिर्णयन होय. साहित्यकृतीची अर्थनिश्चिती ही समीक्षेतील आवश्यक प्रक्रिया आहे.

मूल्यांच्या कसोटीवर साहित्यकृतीचे वर्णन, विश्लेषण करणे म्हणजे वाङ्मयीन मूल्यमापन होय. संहितेतील वस्तुगत गुणांना वस्तुनिष्ठ कलामूल्ये म्हणतात. हे मूल्यमापन साहित्यकृतीच्या स्वरूपाशी व निर्मितीशी म्हणजे तिच्या कारणांशी निगडित असते; म्हणून त्यास कारणमुखी अंतर्लक्ष्यी मूल्यमापन

म्हणतात. अलंकार, प्रतिमा, वक्रोक्ती, नादमयता, ध्वनी, भावार्थघटकांची लयबद्ध रचना, सेंद्रिय एकता अशा मूल्यांचा येथे वापर होतो.

साहित्यकृती वाचकाच्या मनावर विशिष्ट प्रकारचा कलात्म परिणाम करीत असते. त्याच्या आधाराने साहित्य कृतीच्या सौंदर्यात्मक कार्याचे मूल्यमापन केले जाते. ही मूल्ये रसिकाच्या मानसव्यापाराशी संबंधित असतात. त्यामुळे त्यांना ज्ञातृनिष्ठ सौंदर्यमूल्ये म्हणतात. हे मूल्यमापन साहित्यकृतीच्या परिणामाशी–वाचकाने दिलेल्या प्रतिसादाशी संबंधित असते; म्हणून त्यास कार्यमुखी मूल्यमापन म्हणतात.

कॅथॉर्सिस, रस, समधातता यासारख्या मूल्यांचा येथे वापर होतो.

साहित्यकृतीच्या संहितेबरोबर जाऊन केलेल्या मूल्यमापनास बहिर्लक्ष्यी मूल्यमापन म्हणतात. त्याचे अनेक प्रकार संभवतात. साहित्य व जीवन यांचे संबंध दृढ मानणाऱ्या भूमिकेतून केल्या जाणाऱ्या मूल्यमापनास जीवनवादी मूल्यमापन म्हणतात. त्यात वास्तवता, संभाव्यता, सुखदुःखात्मक लोकस्वभावाचे चित्रण यासारख्या मूल्यांचा वापर केला जातो.

साहित्य हे कशाचे तरी साधन आहे; असे मानून केलेल्या मूल्यमापनास साधनवादी मूल्यमापन म्हणतात. त्यात नीतिबोध, मनोरंजन यासारख्या मूल्यांचा वापर केला जातो.

साहित्य आणि लेखक यांच्या संबंधांना केंद्र करणाऱ्या मूल्यमापनास आविष्कारवादी मूल्यमापन म्हणतात. त्यात उत्फूर्तता, सहजता, भावनांचा सच्चेपणा, लेखनपूर्व आत्मनिष्ठेची जपणूक यासारख्या मूल्यांचा वापर केला जातो.

अशा वेगवेगळ्या निकषांनी, वेगवेगळ्या प्रकारांनी साहित्यकृतीचे मूल्यमापन करणे, हाच साहित्यसमीक्षेचा मुख्य उद्देश असतो.

साहित्यकृतीपासून मिळणारा आनंद चाखणे म्हणजे आस्वाद घेणे होय. या आस्वादासाठीच समीक्षक साहित्यकृतीच्या समीक्षणाला प्रवृत्त होतो. समीक्षा केल्यावर साहित्यकृतीचे पूर्ण आकलन होते. रसिकाच्या मनाचे समाधान होते. त्याच्या मनाच्या या अवस्थेलाच आस्वाद असे म्हणतात.

साहित्यकृतीच्या आस्वादाचा समीक्षकाला आलेला आनंदमय अनुभव त्याने पुन्हा शब्दबद्ध केला तर त्याची समीक्षा कलारूप होते.

साहित्याचा केवळ अनिर्वचनीय, स्वान्त-सुखाय भावनिक आस्वाद म्हणजे साहित्याची समीक्षा नव्हे. त्याचप्रमाणे अशा अर्थाचा आस्वाद साहित्याच्या अभ्यासातून पूर्णपणे वगळताही येत नाही. त्यामुळे साहित्यकृतीच्या आस्वादातून मिळणाऱ्या आनंदाचा, साहित्यकृतीच्या रसिकमनावर होणाऱ्या परिणामाचा, प्रभावाचा उलगडा साहित्यकृतीच्या संहितेच्या वर्णन-विश्लेषणातून साहित्यतत्त्वांच्या आधाराने करणे म्हणजे साहित्याची समीक्षा होय. ती अर्थातच शास्त्ररूप असते.

आस्वादाचा विषय साहित्यकृती हा असतो. साहित्यकृतीची संहिता व रसिक यांच्या सहसर्जक व्यापारातून काव्यार्थरूप सौंदर्यवस्तू सिद्ध होते. तिचे शोधन, चिंतन व मूल्यन करणारी अभिक्रिया समीक्षेत कार्यरत असते. आस्वाद ही एक क्रिया असते तर समीक्षा ही एक प्रक्रिया असते.

साहित्यकृतीचा आस्वाद शब्दबद्ध होतोच असे नाही. पण समीक्षा मात्र शब्दांकित असावीच लागते. शब्दांकन ही समीक्षेची आवश्यक अट आहे. साहित्यकृतीविषयीचा आपला अभिप्राय समीक्षकाला रूपकात्मक भाषेचा आश्रय न घेता, योग्य शब्दात आणि साहित्यशास्त्राच्या परिभाषेत व्यक्त करावा लागतो.

अशाप्रकारे साहित्यकृतीचा अभ्यास करताना समीक्षेत अनेक क्रिया घडत असतात. आकलन, विश्लेषण, संश्लेषण, अर्थान्वेषण, विशदीकरण, तुलना, गुणदोषदर्शन, आस्वाद आणि शब्दांकन, या प्रक्रियांचा काही ठराविक क्रम असतो असे नाही. काही वेळा त्या एककालिक म्हणजे एकाच वेळी घडणाऱ्या असतात. त्याचप्रमाणे त्यांचे आवर्तनही होते; म्हणजे त्या पुन्हापुन्हाही घडत असतात. त्यांचा ठरीव क्रम नसला तरी कोणत्याही समीक्षाव्यवहारात त्या घडत असतात. त्यांचा एकमेकींशी संबंध असतो. त्या परस्परांना पूरक असतात आणि परस्परांवर अवलंबूनही असतात. या

प्रक्रियेतून जाताना साहित्यकृतीचा समीक्षकाचा आस्वाद अधिक डोळस होत जातो. साहित्यकृतीचे स्वरूप, सौंदर्य आणि कार्य यावर प्रकाश पडतो. अशा समीक्षेलाच प्रगल्भ समीक्षा म्हणतात.

समीक्षा वाङ्‌मयामागे असलेल्या व्यवस्थेचा शोध घेत असते. इतर शास्त्रे आपल्या अभ्याससामग्रीची मूल्यनिरपेक्षदृष्टीने व्यवस्था लावीत असतात. समीक्षा मात्र आपल्यासमोर असलेल्या अभ्याससामग्रीची मूल्यांच्या अनुरोधाने व्यवस्था लावते. समीक्षा हे मूल्यांवर अधिष्ठित असलेले प्रमाणशास्त्र (नॉर्मेटिव्ह सायन्स) आहे.

साहित्यकृतीचे विश्लेषण आणि तुलना करून समीक्षा साहित्यतत्त्वांचे विगमनात्मक पद्धतीने शोधन करते. या साहित्यतत्त्वांचा निकष म्हणून वापर करून निगमनात्मक पद्धतीने साहित्यकृतीचे मर्मग्रहण करते. साहित्यतत्त्वे आणि साहित्यकृती यांचे संबंध द्वंद्वात्मक असतात. ते एकमेकांना बदलवितात, घडवितात. समीक्षेत आपण शास्त्राच्या पद्धतींचा वापर करतो पण शास्त्राची उद्दिष्टे मात्र गाठू शकत नाही. इतर शास्त्रांप्रमाणे साहित्यसमीक्षेत निर्णायक, निश्चितार्थी आणि अंतिम सिद्धांत मांडता येत नाहीत.

### ०४ संशोधन आणि समीक्षा : भेद व साम्य

संशोधन आणि समीक्षा यात काही भेदही आहे. त्या दोहोंमध्ये थोडी स्पष्ट-अस्पष्ट अशी भेदरेषा काढण्याचा प्रयत्न करून पाहू.

१. संशोधन हे समस्यामूलक (प्रॉब्लेम ओरिएंटेड) असते. संशोधनाचा आरंभ कोणत्या ना कोणत्या प्रश्नापासून होतो. त्याचे अंतिम किंवा तात्पुरते किंवा अनिर्णित असे उत्तर देऊनच संशोधन अखेर गाठते.

समीक्षा साहित्यकृतीपासून सुरू होते आणि तिचे मूल्यमापन करूनच ती विराम पावते.

२. संशोधनाचा संबंध साहित्यकृतीच्या आस्वादाशी किंवा मूल्यमापनाशी नसतो. फारच झाल्यास साहित्यकृतीच्या आकलनास संशोधन साहाय्यक ठरू शकते.

साहित्यकृतीचा आस्वाद हा रसिकाला समीक्षेसाठी प्रवृत्त करतो. समीक्षेची परिणती आस्वादाचा प्रत्यय अधिक सखोल होण्यात होते. त्यामुळे आस्वाद हा समीक्षेचा जसा पाया असतो तसा कळसही असतो.

३. निश्चित असा प्रश्न किंवा विषय निवडणे, त्याची शास्त्रपुनीत मार्गाने सोडवणूक करणे आणि उपलब्ध ज्ञानात निश्चित व लक्षणीय स्वरूपाची नवी भर घालणे हे संशोधनाचे वैशिष्ट्यच आहे.

ही अट पूर्ण केली तर समीक्षेलाही संशोधन मूल्य लाभते. पण नवोपलब्धी ही समीक्षेची आवश्यक अट नाही. परिचय, प्रतिक्रिया, मांडणी, तपासणी, अभिप्राय एवढ्यावरही समीक्षा थांबू शकते.

४. संशोधन आणि समीक्षा यांच्या लेखनात, तंत्रात ठसठशीत असा फरक असतो.

संशोधन शास्त्रीय विचारपद्धतीने केलेले सत्यान्वेषण असते. त्याला त्याचे असे विशिष्ट अनुशासन (डिसिप्लीन) असते. शोधलेखक काहीही गृहीत धरीत नाही. आपले सारे प्रतिपादन सप्रमाण मांडण्याची त्याची रीत असते. त्यासाठी सामग्री, माहिती, संदर्भ इत्यादींचे तो विहीत पद्धतीने नोंदीकरण करतो. त्याचे विवेचन तर्कशुद्ध संयुक्तिक असते. त्याचे निष्कर्ष सबळ व वस्तुनिष्ठ पुराव्यावर आधारलेले असतात; हे केवळ सांगून त्याचे भागत नाही तर वाचकाला ते पारखून घेण्याची साधनेही त्याला उपलब्ध करून द्यावी लागतात.

समीक्षकाचे उद्दिष्ट स्वमताचे प्रकटन करून वाचकाच्या विचार चिंतनाला चालना देणे एवढेच असते. तो पुष्कळशा गोष्टी गृहीत धरून चालतो. त्यामुळे समीक्षेत वापरलेल्या संज्ञा-संकल्पना, गुंफलेले सूचक संदर्भ, केलेले निर्देश साधारण वाचकांना समजणे अवघड जाते. साहित्यक्षेत्रातील जाणकार वाचकांना मात्र ते समजू शकतात. आपला वाचक हा जाणकार आणि वाङ्‌मयाचे आणि वाङ्‌मयाच्या अभ्यासाचे संस्कार असलेला असतो, हे त्याने गृहीत धरलेले असते.

द. ग. गोडसे, नरहर कुरुंदकर हे मातब्बर समीक्षक होते याविषयी क्वचितच शंका घेता येईल.

तथापि आपले आधार ते स्पष्टपणे नोंदवीत नाहीत. आपल्या आवडत्या मतांची सिद्धता करण्यापेक्षा ती सिद्ध झाली असे समजूनच ते विवेचन करतात. कोठे इतरांचे विवेचन संपले व कोठे त्यांचे विवेचन सुरू झाले याविषयी एक संदिग्धता राहते. त्यांचे प्रतिपादन पडताळून पाहता येत नाही. त्यामुळे त्यांची समीक्षा अव्वल दर्जाची, नवी अंतर्दृष्टी देणारी असूनही शास्त्रोचित लेखनपद्धतीच्या अभावी तिला संशोधनाचा दर्जा देणे अवघड होते. संशोधन नियंत्रणाधिष्ठित व अनुशासनबद्धच असावे लागते.

५. संशोधकाचा भर तथ्यांवर, तपशिलावर अधिक असतो. समीक्षकाचा भर त्यांचा अर्थानुवाद लावण्याकडे अधिक असतो.

६. संशोधक साहित्याकडे निरीक्षकाच्या भूमिकेतून पाहतो. त्याची भूमिका साक्षी द्रष्ट्याची असते. ती वस्तुनिष्ठेकडे अधिक कललेली असते.

समीक्षक साहित्याचा आस्वाद घेत असतो आणि त्याचवेळी काय परिणाम होत आहे, कशामुळे होत आहे यादृष्टीने त्याचे निरीक्षणही करीत असतो. त्याची भूमिका सहभागी निरीक्षकाची असते. तो साक्षी भोक्ता असतो. त्याची समीक्षा आत्मनिष्ठेकडे अधिक कललेली असते. समीक्षकाची साहित्यदृष्टी, मूल्यसंकल्पना, समीक्षेची पद्धत आणि साहित्यकृतीतील सौंदर्य वेचण्याची क्षमता वेगवेगळी असते. त्यांना समीक्षेत महत्त्व असते.

७. संशोधक अनाग्रही वृत्तीने आपले लेखन वाचकांसमोर ठेवतो.

समीक्षक स्वमताची ठसठशीत मांडणी करतो. स्वमताचा पुरस्कार करतो. भावनारंजित शब्दप्रयोग, मूल्यवाचक विधाने आणि विशिष्ट अभिरुचीचा आग्रह समीक्षकाला टाळता येत नाही.

८. संशोधनाची वाटचाल सत्यान्वेषणाच्या शास्त्रीय विचारपद्धतीने होते. संशोधन आपले शास्त्ररूप जपते.

समीक्षा शास्त्रीय वळणाने जाऊ पाहते. पण ती कलारूपही धारण करू शकते. या अर्थाने ती निर्मितीशीलतेला जवळ जाते.

संशोधन हे समस्यामूलक सत्यान्वेषण असते. त्याचे विशिष्ट शास्त्रीय अनुशासन असते. नवोपलब्धी, ज्ञानात पडलेली नवी भर हे त्याचे मर्म असते. त्याचे क्षेत्र व्यापक असते.

समीक्षा ही साहित्यतत्त्वांचा शोध घेते. त्यांचे उपयोजन करून साहित्यकृतींचे मूल्यमापन करते. साहित्यसंशोधनापेक्षा साहित्यसमीक्षेचे क्षेत्र मर्यादित असते.

संशोधन व समीक्षा यांच्यामध्ये काही भेद दाखविला असला तरी त्यांच्यात काही साम्यही आहे. संशोधन ही शोधदृष्टी आहे. त्यामुळे सर्व क्षेत्रांप्रमाणे समीक्षेतही ती क्रियाशील असते. समीक्षा ही तत्त्वान्वेषी आणि शोधानुगामी असते. त्यामुळे संशोधन व समीक्षा यांची पूर्णतः फारकत करता येणार नाही. संशोधन आणि समीक्षा या दोन्हीतही तथ्ये किंवा तत्त्वे यांचे संकलन करावे लागते. त्यांची निवड व चिकित्सा करून त्यांचा त्याग किंवा स्वीकार करावा लागतो. त्यांचे विश्लेषण आणि स्पष्टीकरण करून विशिष्ट निर्णयापर्यंत पोहोचावे लागते. दोन्हींच्या कार्यवाहीत पुष्कळसे साम्य आहे. दोन्हीही साहित्याच्या अभ्यासाची साधने आहेत.

एकूण "समीक्षा व संशोधन काही प्रमाणात समरूप पण बव्हंशी स्वतंत्र व स्वयंनिष्ठ अभिक्रिया आहेत."[३] असे म्हणता येईल.

तथ्ये व तपशील यांचा नव्याने घेतलेला शोध, समस्येचे निराकरण, वस्तुनिष्ठ अशी शास्त्रीय लेखनपद्धती आणि नवोपलब्धी म्हणजे ज्ञानात नव्याने घातलेली भर ही संशोधनाची ठळक वैशिष्ट्ये आहेत. ज्या प्रमाणात ही वैशिष्ट्ये समीक्षेमध्ये येतात त्याप्रमाणात समीक्षेला संशोधनमूल्य प्राप्त होते.

नवार्थदर्शन आणि मूल्यमापन ही समीक्षेची प्राणभूत वैशिष्ट्ये आहेत. ज्याप्रमाणात ही संशोधनात येतात त्या प्रमाणात संशोधनाला समीक्षामूल्य प्राप्त होते.

ही वैशिष्ट्ये 'प्राधान्येन व्यपदेशः भवन्ति।' अशा अर्थाने घ्यावयाची आहेत. ती एकमेकांच्या क्षेत्रात प्रवेश करू शकतात. ज्या प्रमाणात त्यांचा परस्परानुप्रवेश होतो त्या प्रमाणात संशोधनाला

समीक्षामूल्य येते आणि समीक्षेला संशोधनमूल्य प्राप्त होते.

**०५ संशोधन आणि समीक्षा : सहकार्याची गरज**

साहित्यसंशोधनाची प्रक्रिया इतर क्षेत्रातील शास्त्रीय संशोधनासारखीच असते. आरंभ, प्रस्ताव, आराखडा, पडताळा आणि निबंधक या क्रमाने साहित्यसंशोधनही घडत जाते.

'स्वतंत्रतेचे स्तोत्र'[४] ही स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर यांची एक सर्वपरिचित कविता. या कवितेतील एक ओळ पाहावी.

परवशतेच्या नभांत तूंची आकाशीं होशी
स्वतंत्रते भगवती! चांदणी चमचम लखलखशी।।

यातील पहिल्या ओळीत 'नभांत' आणि 'आकाशीं' असे एकाच अर्थाचे दोन शब्द येतात. त्यामुळे या ओळीचा नेमका अर्थ काय असा प्रश्न उभा राहतो. (आरंभ)

'नभांत' हा अपपाठ असावा; कदाचित 'तमांत' असा मूळ पाठ असावा; असा प्रस्ताव स्वीकारून शोध घेता येतो (प्रस्ताव).

त्यासाठी वेगवेगळ्या वेळी, वेगवेगळ्या ठिकाणी ही कविता कशी छापली गेली? कवीचे मूळ हस्तलिखित उपलब्ध होऊ शकते काय? या दृष्टीने धांडोळा घ्यावा लागतो. पण तसा तो घेतल्यावर 'नभांत' हा अपपाठ नाही; तो मुद्रणदोषही नाही. सर्वत्र 'नभांत' असाच शब्द आढळतो. त्यामुळे 'तमांत' असा पाठ स्वीकारण्यास काहीच आधार नाही; असे निष्पन्न होते. तेव्हा पहिला प्रस्ताव नाकारावा लागतो. आता 'नभांत' या शब्दाचा 'आकाशांत' या परिचित अर्थापेक्षा काही वेगळा अर्थ असावा; असा दुसरा प्रस्ताव स्वीकारून परीक्षण करावे लागते. या शोधात 'भा' म्हणजे प्रकाश; 'न भा' म्हणजे 'अंधार' यावरून 'नभांत' म्हणजे 'अंधारात' असा अर्थ निष्पन्न होतो आणि कवितेतील ओळीचा सुसंगत अर्थ लागतो.

अशा प्रकारची अर्थनिश्चिती हे संशोधनाचे फलित म्हणावयाचे. संशोधनाशिवाय या कवितेची समीक्षा केली असती तर कवीला विनाकारण बोल लावावा लागला असता. तेव्हा ही अर्थनिश्चिती महत्त्वाचीच आहे. तथापि येथे साहित्याचा अभ्यास थांबत नाही तर येथून सुरू होतो. 'नभांत' व 'आकाशी' असे प्रथमदर्शनी समानार्थी वाटणारे शब्द वापरून सावरकरांनी या ओळीमध्ये पुनरुक्तवदाभास असा अलंकार साधला आहे. त्यामुळे एक चमत्कृती निर्माण होते. त्यातून कवीची व त्याच्या कवितेची विदग्धवृत्ती जाणवते. संशोधनाला अशी समीक्षेची जोड दिली तरच आपल्याला कवितेच्या मर्मापर्यंत पोहोचता येते.

'ज्ञानेश्वरी'मध्ये विरोधमूलक अलंकारांपेक्षा सादृश्यमूलक अलंकारांची संख्या खूप मोठी आहे; हे संशोधनाने हाती लागणारे तथ्य आहे. पण एवढ्यावरच थांबले तर ते केवळ तथ्याच्या पातळीवरच राहील. त्याचा आधार घेऊन आपण समीक्षा करू शकतो. ज्ञानेश्वरीत पांडित्यापेक्षा रसवत्तेला अधिक महत्त्व आहे. त्याही पुढे जाऊन असे म्हणता येईल की ज्ञानेश्वरीचे स्वरूप बौद्धिक चमत्कृतिप्रधान काव्याचे नाही; ते शांतरसप्रधान काव्याचे आहे. एका वस्तुसत्याच्या आधाराने आपणाला दुसऱ्या वस्तुसत्यापर्यंत जाता येते आणि त्याच्या आधाराने अधिक सूक्ष्मतर वस्तुसत्यापर्यंत पोहोचता येते. संशोधनाने पुरविलेल्या तथ्यांचा आणि तत्त्वांचा अन्वयार्थ समीक्षेच्या साहाय्याने लावावा लागतो तो यासाठीच.

एकनाथी भागवत हे श्रीमद्भागवताच्या एकादशस्कंधावर आधारलेले आहे. मोलिएरच्या 'गानारेल' या फ्रेंच प्रहसनावर मर्फीचे 'ऑल इन द रॉंग' हे नाटक उभे आहे. या दोन नाटकांचा आधार घेऊन गो. ब. देवल यांनी आपले 'संशयकल्लोळ' हे चिरतरुण नाटक बेतले. अशा वेळी साहित्यकृती व तिला आधारभूत असणारी मूळ कृती यांच्या परस्परसंबंधांचा शोध घ्यावी लागतो.

संक्षेप, विस्तार, बदल, क्रमांतर, वेगळ्या काव्यप्रयुक्तींचा वापर आणि नवनिर्मिती अशा अनेक अंगांनी मूलकृतीवर संस्करण करून पुनर्निर्मित कृती

आकाराला आलेली असते. तौलनिक दृष्टीने केलेल्या अशा बदलांच्या वस्तुनिष्ठ नोंदी करावयास संशोधनच करावे लागते. तथापि त्या दोन ग्रंथांची सरस-नीरसता ठरवायची असेल तर समीक्षाच करावी लागते.

समीक्षेचा स्पर्शही नसलेले साहित्यसंशोधन हे नुसते साधनसामग्री संकलित करणारे संदर्भग्रंथ म्हणून मान्यता पावू शकतील. त्यांच्यामुळे नवी व विपुल सामग्री उजेडात येते. ती साहित्याचे वर्णन व आकलन करण्यास साहाय्यभूत ठरते; तथापि ही साहित्याच्या अभ्यासाची प्राथमिक पातळी झाली. साहित्याच्या अभ्यासात त्याच्या अंतरंगाची उकल आणि मूल्यमापन अभिप्रेत असते. ते केवळ समीक्षेनेच करता येते. त्याशिवाय साहित्याच्या अभ्यासाला पूर्णता येत नाही. सध्या संशोधनाचा अर्थ विद्यापीठीय पातळीवर अभ्यासाच्या बाजूला झुकू लागला आहे. नवी सामग्री असो की नसो; उपलब्ध साहित्याची व्यवस्थित समीक्षा करून नवे आकलन, नवे मूल्यमापन करणे; यास विद्यापीठीय पातळीवर मान्यता मिळू लागली आहे.

सत्यान्वेषण हे संशोधनाचे उद्दिष्ट असते. त्यादृष्टीनेच सामग्रीचे संकलन-विश्लेषण केले जाते. या सामग्रीच्या आधारावर आपणास काही विवरणात्मक विधाने करता आली पाहिजेत. अशाच वेळी शोध, संचयन, संकलन, विवरण यांना तत्त्वशोधनाचे स्वरूप येते.

हिंदी साहित्याचे संशोधक-समीक्षक डॉ. नरेंद्र म्हणतात, "मर्माच्या साक्षात्कारासाठी तत्त्वाच्या आकलनावरून पुढे सरून त्यातून ध्वनित होणाऱ्या सत्याचे दर्शन घडणे आवश्यक असते. हेच समीक्षेचे अंतिम फलित असून संशोधनाची अंतिम परिणतीही यातच व्हायला हवी...." आणि म्हणूनच "उत्तम समीक्षा ही अपरिहार्यतया उत्तम संशोधनही ठरते आणि उत्तम साहित्यिक संशोधन आपल्या अंतिम परिणतीत समीक्षेहून निराळे राहत नाही."[५] असे स्पष्ट विधान त्यांनी केले आहे.

समीक्षेचे साहाय्य न घेता साहित्याचे संशोधन अगदीच मर्यादित व प्राथमिक पातळीवर करता येईल. चांगल्या साहित्यसंशोधनाला समीक्षेच्या सहकार्याची आवश्यकता असते; हे त्याचे नैसर्गिक व सामाजिक शास्त्रातील संशोधनापेक्षा वेगळेपण दाखविणारे वैशिष्ट्य म्हणावे लागते.

### ०६ संशोधन आणि समीक्षा : संबंधांचे बदलते स्वरूप

साहित्यसंशोधनाला संशोधन आणि समीक्षा यांचे सहकार्य अपेक्षित असते. हे आपण मागे पाहिले आहे.

संशोधन आणि समीक्षा विविध प्रकारांनी करता येतात, त्यांपैकी काही प्रकारात ते एकमेकांच्या अगदी जवळ येतात तर काही प्रकारात त्यांच्यात अंतर असते. अभ्यासक्षेत्राच्या स्वरूपानुसार त्यांचे संबंध बदलताना दिसतात.

साहित्याच्या संशोधनाची निश्चित अशी पद्धती आपल्याला घडविता आलेली नाही. इतर विषयातील शोधपद्धती साहित्यानुलक्ष्यी रीतीने वापरणे, हीच साहित्य संशोधनाची पद्धत म्हणावी लागेल. त्यामुळे साहित्यसंशोधन वेगवेगळ्या विषयातील पद्धतींनी वेळोवेळी प्रभावित झालेले दिसते. त्याप्रमाणे त्यामागील साहित्यसंशोधनाच्या संकल्पना बदलत गेलेल्या दिसतात. या बदलत्या संकल्पनांचा मागोवा घेतच आपल्याला संशोधन आणि समीक्षा यांच्यातील नात्याची व संबंधांची चर्चा करता येईल.

### ०६.१ इतिहासप्रभावीत साहित्यसंशोधन व समीक्षा

महाराष्ट्रातील संशोधनक्षेत्रावर प्रभाव आहे तो सामाजिक शास्त्रांमधील संशोधनाचा. त्यातही राजवाडे, खरे, पारसनीस, साने, सरदेसाई, बेंद्रे यांनी वाजत्यागाजत्या ठेवलेल्या इतिहाससंशोधनाचा.

संशोधनाने ज्ञानात काही तरी नवीन भर घातली पाहिजे, अशी आपली अपेक्षा असते. ही भर साहित्यसंशोधनात कशा स्वरूपाची असावी, याचे काही आडाखे आपण इतिहाससंशोधन डोळ्यांसमोर ठेवून ठरविले.

अनुक्रमणिका






इतिहाससंशोधक सामग्रीचा धांडोळा घेतो, तिचे परिश्रमपूर्वक संकलन करतो. तिची चिकित्सा करतो आणि त्यातून काही एक तथ्य तो आपल्यासमोर ठेवतो. छत्रपती शिवाजीमहाराज आणि समर्थ रामदास यांची भेट नक्की केव्हा झाली, याचे वर्ष तो सांगतो, त्यामुळे त्या दोघांच्या परस्परसंबंधावर नेमका प्रकाश पडतो.

पुरावा आणि निष्कर्ष यांचे नाते अशा प्रकारच्या संशोधनात अगदी स्पष्ट असते. अशा शोधांना एक निश्चिती असते. त्यांचा शोध प्रथमच लावला असा दावा करता येतो. त्यामुळे साहित्याच्या संशोधनातही अशाच आडाख्यांना महत्त्व आले.

एखादी अनुपलब्ध संहिता शोधून काढणे आणि तिचे प्रामाण्य ठरविणे हा या प्रकारच्या संशोधनाचा एक महत्त्वाचा भाग होता. श्रीपतीभट्टाची 'ज्योतिषरत्नमाला' मु. ग. पानसे यांनी प्रथमच आपल्याला उपलब्ध करून दिली हे त्याचे एक उदाहरण आहे.

सारख्याच नावाच्या व्यक्तींमधून लेखकाची निश्चिती काही वेळा करावी लागते. दोन ज्ञानदेव, पाच नामदेव, तीन वामन पंडित, सात रघुनाथ पंडित यांच्यातून आपल्या समोरच्या साहित्यकृतींचा कर्ता निश्चित करावा लागतो. त्र्यं. शि. भारदे, भिंगारकरबुवा, ज. रा. आजगावकर, वि. ल. भावे, ल. रा. पांगारकर, वि. भि. कोलते, सुरेश डोळके, ज. शां. देशपांडे, के. ना. वाटवे, श्री. म. माटे, म. रा. जोशी, यु. म. पठाण, पां. ना. कुळकर्णी, शं. गो. तुळपुळे अशा किती तरी अभ्यासकांनी या पद्धतीचे संशोधन केलेले आहे. 'वछाहरणा'चा कर्ता केसोबास नसून दामोदर पंडित आहेत; असे वि. भि. कोलते यांनी दाखविलेले आहे.

आपली कृती मोठ्या लेखकाच्या नावाने प्रचारात आणण्याची प्रवृत्ती जुन्या वाङ्‌मयात दिसते. अशावेळी साहित्यकृतींची छाननी करून त्यांचे लेखनकर्तृत्व निश्चित करावे लागते. ज्ञानदेवांच्या नावावर मोडणाऱ्या शंकास्पद प्रकरणांची अशी छाननी करणारे अ. का. प्रियोळकर यांचे संशोधन या प्रकारचे आहे. 'भानुविजया'चे बनावटपण वि. भि. कोलते यांनी असेच उजेडात आणले आहे.

लेखकाच्या स्थल-कालाचे निर्धारण करून त्याच्या चरित्राची संगतवार गुंफण कधी करावी लागते. यादृष्टीने न. शं. पोहनेरकर यांनी केलेले वामनपंडितांचे चरित्रशोधन पाहण्यासारखे आहे. वि. भि. कोलते यांनी भास्करभट्ट बोरीकर यांचे असेच चरित्रशोधन केले आहे.

अशा तऱ्हेचे तथ्यशोधन हेच इ. स. १९५० पर्यंत मराठीमध्ये वाङ्‌मयीन संशोधन म्हणून प्रतिष्ठा पावले. या काळात मराठी वाङ्‌मयाचे इतिहासलेखन चाललेले होते. त्याच्या सिद्धतेसाठी असे तथ्यशोधन आवश्यकच होते. अशा प्रकारच्या संशोधनासाठी आधुनिक साहित्य व साहित्यिक यांचा विशेष उपयोग नव्हता. त्यामुळे मध्ययुगीन वाङ्‌मयाचे अभ्यासक ते संशोधक आणि आधुनिक वाङ्‌मयाचे अभ्यासक ते समीक्षक असा अपसमज रूढ झाला. त्याचा परिणाम म्हणून मध्ययुगीन वाङ्‌मयाची अंतर्वेधी समीक्षा होऊ शकली नाही आणि आधुनिक मराठी साहित्यावर शोधसृष्टीचा झोत फिरू शकला नाही.

अशा तथ्यलक्ष्यी संशोधनालाही वाङ्‌मय-दृष्टीची जोड असावी लागते, मुक्तेश्वर हे कवीचे मूळ नाव नव्हे. ते आपल्या उपास्यदैवताचे लीलाविश्वंभर मुक्तेश्वराचे कवीने धारण केलेले मुद्रानाम आहे; असे तथ्य अ. का. प्रियोळकर उजेडात आणतात. कविचरित्राच्या दृष्टीने त्याला काही महत्त्वही आहे. तथापि त्यानिमित्ताने प्रियोळकरांनी मुक्तेश्वराच्या मंदिरांचा भारतभर, अगदी नेपाळपर्यंत शोध घेतला आणि त्यांची विस्तृत जंत्री सादर केली. ही जंत्री मुक्तेश्वरांच्या कवितेवर तर राहोच पण चरित्रावरही कोणताच प्रकाश टाकीत नाही. मुक्तेश्वरमंदिरांचा शोध हे मुक्तेश्वर कवी आणि कविता यांच्या संदर्भात निव्वळ भरकटणे आहे. मारुती चितमपल्ली यांच्या लेखनाचा अभ्यास करताना गावोगावच्या मारुतीमंदिराची जंत्री करण्यासारखाच हा प्रकार आहे. साधनसंकलनाच्या पातळीवर घोटाळणारे असे प्रयत्न अकारणच संशोधनाची प्रतिष्ठा मिळवीत राहिले. संशोधनाला समीक्षेचे डोळे नसतील तर ते दिशाहीन ठरते. वाङ्‌मयाचा वेध घेण्यास असमर्थ असल्याने समीक्षेच्या

दृष्टीने निरुपयोगी ठरते.

मुक्तेश्वर हा एकनाथांच्या मुलीचा मुलगा होता. पण नाथांना मुली किती? त्यापैकी कोणत्या मुलीचा मुक्तेश्वर मुलगा होता? त्याच्या आईचे नाव गंगा होते की गोदा? माहेरी जिला गंगा म्हणत तिला सासरी गोदा म्हणत होते काय? अशा प्रश्नांवर ल. रा. पांगारकर युक्तिवादपूर्ण विस्तृत चर्चा करतात आणि पुढील डझनभर संशोधक त्यात पुरेपूर रस घेतात.

इतिहास किंवा कविचरित्र म्हणून या प्रकारच्या सत्यशोधनाला निश्चितच महत्त्व आहे. पण या माहितीचा मुक्तेश्वरी कवितेच्या संदर्भात कसा उपयोग करावयाचा; तो कितपत होणे शक्य आहे; याचाही विचार करावयास हवा. मुक्तेश्वरांच्या आईचे नाव काहीही असले तरी ते एकनाथांचे नातू होते, ही निर्विवाद गोष्ट वाङ्मयसंशोधनाला पुरेशी आहे. या तथ्याच्या आधाराने एकनाथ आणि मुक्तेश्वर यांच्यातील वाङ्मयीन संबंध काय होते; त्याचा मुक्तेश्वरी कवितेवर कोणता व कसा परिणाम झाला हे शोधण्यात साहित्यसंशोधनाला रस असला पाहिजे. तथापि हे काम संशोधनाला समीक्षेची जोड देऊन करावे लागेल. अशा ठिकाणी संशोधन आणि समीक्षा हातात हात घालून काम करतात.

तेव्हा कोणतीही माहिती ही माहिती म्हणून जमा करीत राहणे याला साहित्यसंशोधनात महत्त्व नाही. त्यात प्रस्तुत–अप्रस्तुताचा विवेक हवा. संहितेबाहेरच्या कोणत्या गोष्टी कळल्याने संहितेतील सौंदर्याचा उलगडा होईल ते पाहावयास हवे. साधनांचे केवळ संकलन नव्हे तर संयोजन करून निष्कर्षापर्यंत यावयास हवे, तरच त्या संकलनाला संशोधनाची पातळी लाभू शकेल.

साहित्यकृती आणि साहित्यिक यांचा शोध घेऊन स्थल काल कर्तृत्व इत्यादी अंगांनी त्यांचे ऐतिहासिक अस्तित्व निश्चित करण्याचे हे काम आहे. या कामाला वाङ्मयदृष्टीची जोड नसेल तर ते दिशाहीन होईल. अशा पायाभूत तथ्यलक्ष्यी संशोधनांचा आधार नसेल तर समीक्षा खंबीरपणे उभी राहणार नाही. संशोधन आणि समीक्षा यांच्या सहकार्याचे हे क्षेत्र आहे.

### ०६.२ विज्ञानाने प्रभावित साहित्यसंशोधन आणि समीक्षा

विज्ञानाने आपल्याला मध्ययुगातून आधुनिक युगात आणले. विज्ञानाचा असा प्रभाव जसा वाढत गेला, तसा वैज्ञानिक पद्धतीचा महिमाही वाढत गेला. वैज्ञानिक पद्धती कार्यकारणभावावर आधारलेली आणि निश्चित निष्कर्ष हाती ठेवणारी आहे. वैज्ञानिक संशोधनाचे फलित खोटे ठरण्याची संभाव्यता त्यात नेहमीच अनुस्यूत असते, असे पॉपरचा हवाला देऊन चंद्रशेखर जहागिरदार[१] यांनी सांगितले आहे. हेच वैज्ञानिक संशोधनाचे व्यवच्छेदक लक्षण आहे. तोच वैज्ञानिक विचारविकासाचा पाया आहे.

वाङ्मयाचे क्षेत्र हे स्वभावतः वादग्रस्त संकल्पनांचे क्षेत्र आहे. तेथे परस्परविरोधी सत्यांचे सहअस्तित्व असू शकते. त्यामुळे साहित्यसंशोधनात वैज्ञानिक पद्धतीचा वापर एका मर्यादेपर्यंतच होऊ शकतो.

सांख्यिकी (स्टॅटिस्टिक्स) हे वैज्ञानिक संशोधनाचे एक उपयुक्त साधन व प्रमाण म्हणजे निकषही आहे. त्याचा वापर करून ना. गो. नांदापूरकरांनी मुक्तमयूरांच्या 'विराटपर्वा'तील शब्दांची गणना केली आहे. त्यांचा निष्कर्ष असा आहे. "मुक्तेश्वरात ६२२० तत्सम आणि ५९०० तद्भव शब्द आहेत. तर पंतात ५८२० तत्सम आणि ५९२० तद्भव आहेत. मुक्तेश्वरी भाषा पंतांच्या भाषेहून अधिक संस्कृतप्रचुर आहे असेच विधान न्याय्य आणि वस्तुस्थितिदर्शक आहे."[२] एकूण मराठी भाषेच्या शब्दसंग्रहात संस्कृत शब्दांचे जे प्रमाण आहे त्यापेक्षा मुक्तमयूरांच्या काव्यातील ५०.५१ टक्के हे प्रमाण कमी आहे. त्यामुळे त्यांच्या भाषेला संस्कृतप्रचूर म्हणता येणार नाही, असाही नांदापूरकरांचा निष्कर्ष आहे.

नांदापूरकरांचे हे निरीक्षण संख्याप्रमाणावर आधारलेले असून त्याचा पाया भाषावैज्ञानिक आहे. संख्याप्रमाण व भाषाविज्ञान हे कवितेतील शब्दसंग्रहाचे विश्लेषण करण्यास उपयुक्त ठरणारे मूलभूत दृष्टिकोण आहेत. पण काव्यशास्त्रीय दृष्टीने शब्दांची प्रतीतिक्षमता, भाववाहकता व प्रयोजकत्व पाहणे कवितेतील

अनुक्रमणिका






शब्दकळेच्या संदर्भात अधिक महत्त्वाचे ठरते. कवितेत शब्द कोणत्या स्तरभेदातून व भाषाभेदातून आले आहेत ते पहावे लागतेच पण त्यापेक्षाही ते कसे वापरले गेले आहेत, यावरही भर द्यावा लागतो.

या दृष्टीने नांदापूरकरांचा सविस्तर प्रतिवाद करून मी कसे दाखवून दिले की "संख्याप्रमाणाने मुक्तेश्वरी कविता मोरोपंती कवितेपेक्षा अधिक संस्कृतप्रचूर आहे असे दाखविता येईलही पण संस्कृत शब्दांची जी निवड आणि वापर या दोघांनी केला आहे. त्यामुळे मुक्तेश्वरी कविता मोरोपंती कवितेपेक्षा अधिक प्रासादिक आणि भावसंक्रामक झाली आहे, हे निश्चित."[८] अशा प्रकारे शब्दांचे संख्याप्रमाण त्या शब्दांच्या अर्थव्यंजकतेच्या विचाराशिवाय अपुरे ठरते. वैज्ञानिक पद्धतींच्या वापराला साहित्यसंशोधनात मर्यादा येतात त्या अशा.

संहिताचिकित्सा, पाठशोधन, पाठनिश्चिती हेच वैज्ञानिक पद्धतीचे साहित्यसंशोधनातील योग्य क्षेत्र आहे. साहित्य संहितेचे प्रतीकरण होते; म्हणजे अनेक प्रती केल्या जातात. या प्रतींचे समाजामध्ये अभिसरण होत राहते. या प्रक्रियेत संहिता अपपाठांनी दूषित होते. मौखिक युगामध्ये ही प्रक्रिया अधिक प्रमाणात होते. मुद्रण युगामध्ये तिचा वेग पुष्कळच कमी होतो. त्यामुळे मध्ययुगीन मराठी साहित्यात संहिताचिकित्सा हा निकडीचा प्रश्न होतो. तितकी निकड अर्वाचीन साहित्यात जाणवत नसली तरी नसतेच असे नाही. केशवसुत, माधव जुलियन, वि. दा. सावरकर, पु. शि. रेगे, बा. सी. मर्ढेकर यांच्या कवितांची व श्री. ना. पेंडसे यांच्या कादंबऱ्यांची जी पाठचिकित्सा झाली, परिष्करणांची पाहणी झाली त्यावरून अर्वाचीन साहित्यातही संहिताचिकित्सा हे महत्त्वाचे संशोधनक्षेत्र आहे, हे मान्य करावे लागते.

संहितेच्या उपलब्ध प्रती आणि त्यावरून अनुमानित करता येणाऱ्या प्रती यांची साधकबाधक प्रमाणांनी चिकित्सा करून संहितेची यथापूर्व पुनर्रचना, पुन:स्थापना करणे हे या संशोधनाचे उद्दिष्ट असते. हस्तलिखितांचे संकलन करणे, त्यांच्या स्थळकाळाची निश्चिती करणे, त्यांच्या विश्वसनीयतेची पडताळणी करणे, त्यांचे वर्गीकरण करणे, त्यांचा कुलवृक्ष कल्पिणे अशा कामांच्या आधाराने पाठशोधन व पाठचिकित्सा करून पाठनिश्चिती करणे असे या शोधक्रियेचे स्वरूप असते. ज्ञेयनिष्ठ किंवा ज्ञातृनिष्ठ पद्धतीने (विशिष्ट वस्तुनिष्ठ किंवा विशिष्ट दृष्टीनिष्ठ पद्धतीने) संहिताचिकित्सा करता येते. संगणकाच्या साहाय्याने संहिताचिकित्सा करता यावी एवढी वस्तुनिष्ठा व शास्त्रीयता या शोधक्षेत्रात आणण्याची उमेद पाश्चात्त्य संशोधक बाळगून आहेत. परिश्रम, अवधान, विवेचकता, कल्पकता आणि शोधप्रतिभा अशा अनेक अंगांनी संशोधकाचा कस लागावा, असे हे काम असते. संहिताचिकित्साशास्त्रात यास संहितानिष्ठ पायाभूत चिकित्सा (लोअर क्रिटिसिझम) म्हणतात.

डॉ. वि. भि. कोलते यांनी संपादित केलेले 'वछाहरण' (इ. स. १९५३) हे ज्ञेयनिष्ठ संपादनाचे तर 'लीळाचरित्र' (इ. स. १९८२) हे ज्ञातृनिष्ठ संपादनाचे उत्कृष्ट उदाहरण आहे.

अशा पाठशुद्ध चिकित्सक संहितेच्या आधारावरच समीक्षेची इमारत भक्कमपणे उभी राहू शकते यादृष्टीने हे पायाभूत संशोधन आहे. त्यात 'मूळ' पाठ किंवा 'खरा' पाठ शोधण्याचा प्रयत्न असतो. पण जो पाठ शोधला तो 'बरा' आहे की नाही ते ठरवायचे तर समीक्षा करूनच ठरवावे लागते. येथे संशोधन हे समीक्षेला साधनसामग्री पुरविते असे म्हणावे लागते.

संस्कृत ग्रंथांचा आधार घेऊन मराठीत पुष्कळ रचना झालेली आहे. गीता भागवतावरील टीका, भाष्यकाव्ये आणि रामायण–महाभारतासारखी आर्षकाव्ये–पुराणे यावर पोसलेली कथाकविता ही त्याची उदाहरणे आहेत. अशा ग्रंथांचा अभ्यास करावयाचा तर मूळ ग्रंथांशी तुलना करावी लागतेच. ही तुलना करताना तुलनीय संहिता निश्चित करण्यासाठी संशोधन आवश्यक ठरते.

सूर्याने द्रौपदीला भोजन पुरविणारी थाळी दिली; या प्रसंगावरील 'थालीपाक', 'दुर्वासभोजन' यासारखी आख्याने मराठीत आहेत. पण हा प्रसंगच मूळ





भारतात नाही असे मुक्तेश्वरांनी नोंदविलेले आहे.

यावर "गृह्णिणष्व पिठरं ताम्रं" : हा महाभारतातील श्लोक उद्धृत करून चिं. वि. वैद्य, ना. गो. नांदापूरकर, द. सी. पंगु, वि. म. कुलकर्णी यांनी मुक्तेश्वरांना बोल लावलेला आहे. यासाठी त्यांनी महाभारताच्या नीलकंठी प्रतीचा आधार घेतलेला आहे. या नीलकंठाने 'भारतभावदीपिका' या नावाची महाभारतावर टीका लिहिली आहे. तिचे आदिपर्व इ. स. १६८७ मध्ये लिहिले गेले आहे. जगभराच्या विद्वानांनी ज्या गणपत कृष्णाजीच्या प्रतीचा आधार घेऊन महाभारताचा अभ्यास केला ती प्रत तर आणखी अर्वाचीन म्हणजे अठराव्या शतकातील आहे.

आता मुक्तेश्वर जर इ. स. १६४० मध्येच निजधामाला गेले असतील तर त्यांच्यासमोर नीलकंठी प्रत कशी असेल, याचा कोणी विचारच केलेला नाही. अशा वेळी मुक्तेश्वरांसमोर महाभारताची नेमकी कोणती प्रत होती याचा छडा लावावा लागतो. त्यांच्यासमोर असलेल्या महाभारताच्या प्रतीत सूर्यथालीचा वृत्तांत नव्हता, हे तर उघड आहे. मग हा भाग नसलेल्या महाभारताच्या कोणकोणत्या प्रती आहेत हे चिकित्सक प्रतीतील सामग्रीच्या आधाराने शोधता येते.

तेव्हा मुक्तेश्वरांनी महाभारताचा कोणता भाग गाळला, कोणता भाग अधिकचा वाढविला, कोणकोणते बारीकसारीक बदल केले याची यादी करावी लागते. त्या घटकांचा शोध चिकित्सक साधनांमध्ये करावा लागतो. चिकित्सक संहिता, नोंदविलेले पाठभेद, दिलेली परिशिष्टे आणि पुरवलेली चिकित्सक साधने यांचा वापर करावा लागतो. या पद्धतीने मुक्तेश्वरांसमोर असलेल्या भारतप्रतीची पाठपरंपरा आपण शोधू शकतो. मी शोधलेल्या ४९ स्थळांपैकी ४८ स्थळे महाभारताच्या उत्तर-पूर्व गटातील डी ४ या प्रतीशी जुळती होती. तेव्हा डी ४ या प्रतीला आधारप्रत मानून मुक्तेश्वरी भारताची मूळ महाभारताशी तुलना करणे योग्य ठरते.

हे संशोधकीय तथ्य समोर येताच आपल्या समीक्षेचा मोहरा बदलून जातो. आधारप्रतच बदलली तर संक्षेप-विस्तार, प्रक्षेप-अवक्षेप, बदल-नवनिर्मिती याविषयीची नवी तथ्ये समोर येतात. त्यांच्या रूपांतर प्रक्रियेवर आपल्या समीक्षेच्या रसदृष्टीचे सूक्ष्मदर्शक रोखता येते. तुलनीय स्थळांचा वाङ्मयीन अन्वयार्थ लावता येतो. अशा रीतीने संशोधन समीक्षेला दिशा देणारे ठरते.

### ०६.३ कार्यकारणभावावर आधारलेले साहित्यसंशोधन आणि समीक्षा

विज्ञानाच्या उदयानंतर कार्यकारणाभावावर आधारलेल्या वैज्ञानिक पद्धतीचे रूप साहित्याच्या संशोधनाला देण्याचे उत्साही प्रयत्न पा चात्त्य देशात दिसतात. विज्ञानयुगाच्या पूर्वी साहित्याची निर्मिती ही गूढ, अलौकिक किंवा दैवी समजली जात होती. विज्ञानयुगाने एक ऐतिहासिक घटना म्हणून तिच्याकडे पाहण्याची भूमिका दिली. वंशदाय, युगमानस आणि काळ यांनी साहित्य प्रेरित, प्रवाहित आणि नियंत्रित होते; हा हिप्पोलिन तेनचा सिद्धांत वैज्ञानिक वळणाचा कार्यकारणभाव सुचविणारा आहे. झाड आणि फळ यांच्यासारखेच लेखक आणि साहित्यकृती यांचे नाते गृहीत धरून से-बव्हने लेखकाच्या साहित्यसृष्टीची कारणे त्याच्या चरित्रात शोधण्याचा मार्ग दाखविला होता. निरनिराळ्या मनोगंडात साहित्यकृतींचा उगम शोधणाऱ्या फ्राइडसारख्या मनोविश्लेषणवाद्यांनीही या गृहिताला आधार पुरविले. समाजाची सरंचना आर्थिक पायावर आधारलेली असते. त्यावरच केलेची अतिरचना उभी राहते, असे मानणाऱ्या मार्क्सवाद्यांनीही या वैज्ञानिक पद्धतीचीच कास धरली. उद्‌गम, विकास, उत्क्रांती अशी परिभाषा वापरणाऱ्या साहित्याभ्यासकां-वर डार्विनच्या विकासवादाचा स्पष्ट प्रभाव आहे.

मराठीतही असे प्रयत्न दाखविता येतात. लोकमान्य टिळकांचे युयुत्सू राष्ट्रवादी तत्वज्ञान, शेक्सपियरचे नाट्यतंत्र आणि बालगंधर्वांचा अभिनय या तीन कारणघटकांनी कृ. प्र. खाडिलकर यांच्या नाटकांचे रूप-स्वरूप कसे ठरत गेले याचा उलगडा गंगाधर गाडगीळांनी फार मार्मिकपणे केलेला आहे. साहित्य आणि कालतत्त्व यांच्या संबंधाविषयीचे सिद्धांतन आणि प्रात्यक्षिके द. ग. गोडसे यांच्या शोधसमीक्षेत दिसतात.

साहित्यकृतीच्या बाह्यसंदर्भाचा वेध घेणे हे










समीक्षेचे एक काम असते.साहित्यकृतीचा एक संबंध तिच्या निर्मात्याशी म्हणजे लेखकाशी असतो. साहित्यकृतीचा दुसरा संबंध ज्यातून ती आशयद्रव्ये शोधून घेते आणि परिणाम करणाऱ्या प्रभावीपणाने परत पोहोचविते त्या समाजाशी असतो. साहित्यकृतीचा तिसरा संबंध तिचा आस्वाद घेणाऱ्या वाचकांशी असतो. या तिन्ही संबंधाचा विचार समीक्षकाला करावा लागतो. पण त्याला केवळ समीक्षेवर विसंबून राहता येत नाही तर संशोधनाचेही साहाय्य घ्यावे लागते. त्यामुळे अशा अभ्यासासाठी 'शोध-समीक्षा' असा जोडशब्द वापरणे मला योग्य वाटते. येथे संशोधन आकलनाच्या पातळीवर समीक्षेला साहाय्य करते असे म्हणावे लागते.

लेखक आणि साहित्यकृती यांच्या संबंधांचा उलगडा करण्याचे प्रयत्न जुन्या अभ्यासकांनीही केले आहेत. तथापि ल. म. भिंगारे, द. न. गोखले, जया दडकर आणि म. वा. धोंड यांनी त्या संदर्भात जी साक्षेपी आणि मर्मदृष्टी दाखविली आहे ती विशेषच आहे. त्यांच्या अभ्यासाचा कस व गुणवत्ता मान्य करावी अशीच आहे. तरीही जया दडकरांचा अभ्यास संशोधनाच्या पातळीवरच राहतो. त्याला चि. त्र्यं. खानोलकरांच्या समीक्षेचे रूप येऊ शकत नाही. जया दडकर, खानोलकरांच्या शब्दांचा आधार घेऊन त्यामागील त्यांच्या जीवनवास्तवाचा तपशील कणकणाने व परिश्रमाने उभा करतात पण त्यामुळे खानोलकरांच्या साहित्याचे नवदर्शन घडते, असे होत नाही. त्यामुळे त्यांचे चरित्रशोधन संशोधनाच्याच पातळीवर राहते. चरित्रशोधनाच्या वाटेने म. वा. धोंड, मर्ढेकरांच्या कवितेचा वेध घेऊ पाहतात. तथापि मर्ढेकरांच्या कवितेला ते क्षणोक्षणी तिच्यामागील जीवनवास्तवाशी जखडू पाहतात. तिच्या जन्मकाळापुरते सीमित करू पाहतात. त्यामुळे त्यांचे चरित्रशोधन सुयोग्य काव्यसमीक्षादृष्टीच्या अभावी मर्ढेकरी कवितेला आवळून टाकणाऱ्या फासासारखे होते. तुलनेने द. न. गोखले यांनी माधव जुलियन किंवा वि. दा. सावरकर यांच्या चरित्राची व काव्याची जी छाननी केलेली आहे ती अधिक एकात्म, मौलिक आणि संशोधन व समीक्षा यांची मिळणी करणारी आहे.

कार्यकारणभाव आणि संबंध यांचे शोधन करणारे साहित्यसंशोधन समीक्षेला आकलनासाठी साहाय्यक ठरते, असे म्हणता येईल.

### ०६.४ तत्त्वज्ञानाने प्रभावित साहित्यसंशोधन आणि समीक्षा

साहित्यसंशोधनावर प्रभाव गाजविणारे तिसरे शास्त्र तत्त्वज्ञान हे आहे. इतिहास संशोधनाच्या पद्धती व आडाखे साहित्यसंशोधनात मर्यादित प्रमाणातच उपयुक्त ठरतात. त्यामुळे तत्त्वज्ञानातील संकल्पनाशोधाच्या जातीचा संकल्पनाशोध हा साहित्यसंशोधनाचा भाग ठरावा, असा रा. भा. पाटणकर [१०] यांचा आग्रह आहे.

या संदर्भात त्यांनी टी. एस. इलियटच्या 'ट्रॅडिशन ॲण्ड इंडिव्हिज्वल टॅलेंट' या शोधनिबंधाचे उदाहरण दिले आहे. रोमँटिसिस्ट टीकाकार कविता आणि कवी यांच्या संबंधावर अधिक भर देत होते. त्यातून चरित्रात्मक आणि मानसशास्त्रीय टीकापद्धती जन्मास आल्या. टी. एस. इलिएटने कविता आणि कवी यांची नाळ तोडली. कवी आणि काव्याची परंपरा यांच्या संबंधाकडे त्याने आपले लक्ष वेधले. त्यामुळे समीक्षेला नवे परिमाण प्राप्त झाले.

दि. के. बेडेकर यांनी रस आणि यज्ञसंस्कृती यांच्यामध्ये असाच नवा संबंध जोडला आणि रससिद्धांताकडे पाहण्याची नवी अंतर्दृष्टी दिली. येथे पूर्वसिद्धांताचा शोधबुद्धीने पुनर्विचार केलेला आहे. त्याचा वेगळा अर्थ लावला आहे. त्यासाठी संकल्पनांची वेगळी जोडणी केलेली आहे. येथे शोध आहे, चिकित्सा आहे आणि मूल्यमापनही आहे.

अनुभवजन्य पुराव्यावर आधारलेल्या संशोधनापेक्षा संकल्पना शोध वेगळ्या पातळीवरचे असतात. त्यातील शोधांना निश्चिती व सर्वमान्यता लाभतेच असे नाही. एकाच काळात दोन परस्परविरोधी संकल्पनाशोध संभवतात. दोन्हींचे समर्थक हिरीरीने वाद घालीत राहतात.

संशोधन म्हणजे चिकित्सक दृष्टीने केलेला अभ्यास व त्याद्वारे शोधलेला नवा निष्कर्ष असे म्हणता

येईल. तथापि आपल्याकडे प्राकृतिक किंवा ऐतिहासिक तथ्यांचा अभ्यास व तथ्यांच्या पातळीवरील निष्कर्ष यांना संशोधन म्हणून मान्यता मिळाली.

खरे तर तात्त्विक पातळीवर नवी संकल्पना मांडणे किंवा प्रचलित घटकांमध्ये नव्या प्रकारचे संबंध जोडणे हे उच्च दर्जाचे संशोधन मानले पाहिजे. दि. के. बेडेकर यांच्यासमोरच्या रस व यज्ञसंस्कृती याविषयीच्या संकल्पना वेगळ्या प्रकाराने जोडलेल्या होत्या. त्यामुळे काही बिकट प्रश्न निर्माण झालेले होते. बेडेकरांनी या संकल्पनांचे प्रस्थापित संबंध तोडले. त्यांच्यात नवे संबंध जोडले आणि प्रश्नांचा उलगडा कसा करता येतो; हेही विशद केले.

अशा प्रकारचा संकल्पशोध विगमन-निगमन, कार्यकारण-तुलना, विश्लेषण-संश्लेषण यांच्या प्रक्रियेतून घडायला हवा. त्याला वस्तुनिष्ठ वृत्तीने दिलेल्या पुराव्याचे पाठबळ हवे. तरच अशा संकल्पनाशोधाला वाङ्मयीन संशोधक म्हणून मान्यता देता येईल.

अशा संकल्पनाशोधांचे संदर्भक्षेत्र साहित्याच्या बाबतीत मुख्यतः साहित्यमीमांसा हेच राहते. नव्या संकल्पनांचा नकाशा देणे हे मूलभूत संशोधन आहे, ते नाकारणे म्हणजे बौद्धिक मागासलेपणा आहे; असे आवर्जून सांगणारे पाटणकर आपल्या मौलिक ग्रंथाला "सौंदर्यमीमांसा" हेच नाव देतात. "सौंदर्यसंशोधन" असे नाव देत नाहीत, हे या संदर्भात लक्षात घेण्यासारखे आहे.

साहित्यमीमांसा (थिअरी ऑफ लिटरेचर) हा सौंदर्यशास्त्रातील (एस्थेटिक्स) कलामीमांसेचा (थिअरी ऑफ आर्ट) एक भाग आहे. त्यात साहित्यकृती आणि साहित्यनिधी यांचा संदर्भ असतो. त्याच्या आधाराने समीक्षेत केली जाणारी साहित्यविषयक विधाने, वापरल्या जाणाऱ्या संकल्पना व मूल्ये यांची चिकित्सा केली जाते. त्यांची व्यूहरूप मांडणी केली जाते. हे साहित्यमीमांसेचे मुख्य काम आहे.

साहित्यमीमांसेतील शोध असे संकल्पनात्मक असतात. त्यात नव्या संकल्पना मांडल्या जातात. निरनिराळ्या संकल्पनातील जुनी रूढ नाती तोडणे आणि त्यांच्यात नवी नाती निर्माण करणे; हे या शोधांचे स्वरूप असते. आतापर्यंतचे साहित्यसिद्धांत एकत्र करून लौकिकतावाद आणि अलौकिकतावाद अशा दोन गटात त्यांचा विचार रा. भा. पाटणकर यांनी केला आहे. "सौंदर्यमीमांसेत सौंदर्यशास्त्रीय संकल्पनांची द्वि-ध्रुवात्मक मांडणी करणारा एक नवा नकाशा देऊन रा. भा. पाटणकर यांनी स्वतः या प्रकारचे मौलिक संशोधन केले आहे. बा. सी. मर्ढेकर यांनी विशद केलेला लयसिद्धांत किंवा काव्यातील नवीनतेची संकल्पना याप्रकारचे संशोधनच आहे. रीतिप्रधान, प्रतिकृतिप्रधान आणि कृतिप्रधान अशी मराठी कादंबरीची मांडणी करून तिचा नव्या दृष्टीने विचार करणारी एक चौकट भालचंद्र नेमाडे यांच्या शोधनिबंधाने पुरविली आहे. रस आणि लय या केंद्रीय सिद्धांतांना दूर सारून 'मानुषता' या तत्त्वाची केंद्रीय स्थानी प्रतिष्ठापना करण्याचा शरश्चंद्र मुक्तिबोध यांचा प्रयत्नही अशा संशोधनाचा नमुना आहे."

संकल्पनांचा शोध स्वाभाविकपणे साहित्या-कडे पाहणाऱ्या नव्या अंतर्दृष्टीत परिणत होतो. त्याचा संबंध स्वाभाविकपणे साहित्यसमीक्षेशी येऊन पोहोचतो.

### ०७. समारोप

साहित्यसंशोधन आणि साहित्यसमीक्षा ही साहित्याच्या अभ्यासाची दोन महत्त्वपूर्ण क्षेत्रे आहेत. अभ्यासाचे क्षेत्र, उद्दिष्ट आणि अभ्यासकाची क्षमता यानुसार त्यांचे परस्परसंबंध वेगवेगळ्या प्रकारचे राहतात.

संहिताचिकित्सा, साहित्यकृती आणि तिचे पर्यावरण यांचे परस्परसंबंध आणि वाङ्मयाचा इतिहास या क्षेत्रात संशोधन आणि समीक्षा आपापल्या उद्दिष्टांनुसार काम करतात आणि एकमेकांना साहाय्यक ठरतात.

साहित्याभ्यासाच्या इतर क्षेत्रात त्यांच्या स्वरूपाप्रमाणे हे संबंध बदलतात. संशोधन जेव्हा तथ्यशोधनाच्या पातळीवर राहते तेव्हा त्याचे स्वरूप वर्णनविधानांचे असते. अशा वेळी संशोधन समीक्षेला पूरक ठरते. संशोधनाने उपलब्ध झालेल्या तथ्यांचा वापर करून समीक्षा साहित्यविषयक मूल्यनिर्णय करू शकते.

संशोधन जेव्हा तत्त्वशोधनाच्या पातळीवर जाते तेव्हा त्याचे स्वरूप मूल्यविधानांचे असते. अशावेळी संशोधनाला समीक्षेचे रूप प्राप्त होते आणि समीक्षेला संशोधनमूल्य प्राप्त होते.

साहित्यकृतीचा अंतर्वेध घेणे हे समीक्षेचे मुख्य काम आहे. त्यासाठी साहित्यकृतीचा स्वत:शी म्हणजे संहितेशी जो संबंध असतो तो समीक्षकाला लक्षात घ्यावा लागतो. हे काम साहित्यसमीक्षा आपल्या मर्यादेत राहून स्वबळावर करू शकते. साहित्यकृतीविषयीची नवीच अंतर्दृष्टी अशा समीक्षेतून व्यक्त झाली तर तिला संशोधनाची पातळी प्राप्त होऊ शकते. माधव आचवल यांनी 'जास्वंद'मध्ये निरनिराळ्या कलाकृतींची जी समीक्षा केलेली आहे ती या प्रकारच्या शोधसमीक्षेचे उत्तम उदाहरण आहे. गो. वि. करंदीकर यांचे 'अनुभवामृताचे अर्वाचिनीवारण' हाही अशा शोधसमीक्षेचा उत्कृष्ट नमुना आहे.

संशोधन व समीक्षा या अभिक्रियांचा साहित्याच्या अभ्यासात वाङ्‌मयविवेकाने वापर करावा लागतो. त्यांच्या मिळणीने साहित्याचा अभ्यास कसदार होतो. असे अखेरी म्हणता येईल.

### ०८ संदर्भ आणि टीपा

१. "विद्यार्थ्याच्या संवेदनशीलतेवर संस्कार घडवून त्याच्या हाती काही बौद्धिक कौशल्ये देऊन त्याला सुबुद्ध समीक्षक बनविणे हे शिक्षणक्रमाचे उद्दिष्ट......." रा. भा. पाटणकर, "साहित्यसमीक्षेचे अध्यापन", समाविष्ट "साहित्य: अध्यापन आणि प्रकार", श्री. पु. भागवत आणि इतर (संपा.), पॉप्युलर आणि मौज प्रकाशन, मुंबई, १९८७ पृ. ४०.

२. गंगाधर पाटील, "साहित्यसमीक्षेचे स्वरूप" अनुष्टुभ, सप्टेंबर-ऑक्टोबर आणि नोव्हेंबर-डिसेंबर १९८७.

३. दु. का. संत, "साहित्यसमीक्षा आणि संशोधन", समाविष्ट "भाषा व साहित्यसंशोधन खंड १", वसंत स. जोशी (संपा.), महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे १९८१ पृ. ३४६.

४. वि. दा. सावरकर, "मूर्ति दुजी ती", ना. ग. जोशी (संपा.), व्हीनस प्रकाशन, पुणे १९६७, पृ. ४

५. नगेंद्र, "संशोधन आणि समीक्षा" समाविष्ट "डॉ. कोलते गौरवग्रंथ", मधुकर आष्टीकर (संपा.), गौरवग्रंथ प्रकाशन समिती, अमरावती, १९६९ पृ. १२८

६. चंद्रशेखर जहागिरदार, "संशोधनाच्या विविध पद्धती आणि साहित्यसंशोधन", किसनवीर महाविद्यालय, वाई येथे वाचलेला चक्रमुद्रित निबंध, १९९२ पृ. २.

७. ना. गो. नांदापूरकर, "मुक्त मयूरांची भारते", मराठवाडा साहित्य परिषद, हैदराबाद, १९५६ पृ. ५९०-५९१.

८. र. बा. मंचरकर, "मुक्तेश्वरांची कविता-वाङ्‌मयीन अभ्यास" खंड तिसरा-महाभारत, मराठी संशोधन मंडळ, मुंबई, १९८७ पृ. २४३-२४४.

अनुक्रमणिका

# स्वातंत्र्यात जगण्याची दृष्टी व दिशा

## बाबूराव चंदावार

स्वातंत्र्याचा अर्थ ज्या प्रमाणात उलगडत जाईल, त्या प्रमाणात त्याचे निर्दोषत्त्व सिद्ध होत राहील. पण, जगात या वेळी स्वातंत्र्याचा विकृतार्थच प्रभावी ठरताना दिसते आहे, असे वाटते. स्वातंत्र्याची आस्था ज्यावेळी तीव्र होत जाते त्यावेळी त्यातून कठोरता येऊ लागणे स्वाभाविक असते. म्हणून, ही कठोरता स्वातंत्र्याची तीव्रतम अभिव्यक्ती आहे, हे मानायला हवे. कठोरपण मुळातच स्वातंत्र्यातले असल्यामुळे ते बोचरेच असूही शकते. अर्थात, या बोचरेपणालाच उग्रवाद म्हणण्याची प्रथा पाडली गेलेली आहे. स्वातंत्र्याच्या तीव्रतम अभिव्यक्तीला उग्रवादात परिवर्तित होण्याची जी काही कारणे असू शकतील त्यांचा संयमपूर्वक शोध घ्यायला हवा. पण, असा शोध घेतला जात नसावा यामुळे कदाचित उग्रवादाला दहशतीचा आश्रय घ्यावा लागत असावा. तेव्हा, उग्रता स्वातंत्र्याची अभिव्यक्ती नव्हे, असा जेव्हा ग्रह करून घेतला जातो, तेव्हा अशा सार्वत्रिक ग्रहामुळे उग्रवाद्यांना दहशतीचा आश्रय घ्यावा लागत असावा, असे म्हणता येऊ शकते. अर्थात, उग्रता स्वातंत्र्याच्या आस्थेतली मानूनच त्याच्या अभिव्यक्ती-कडे हळुवार मनाने पाहणे जर शक्य झाल्यास, त्यातून जी सहानुभूती प्रकट होऊ शकेल ती दहशतीचा आश्रय घेण्यापासून उग्रवाद्यांना थांबवू शकेल. पण, हे प्रत्यक्षात घडताना दिसत नाही. म्हणून, उग्रता दहशतीचा आश्रय घेऊनच दहशतवादात व्यापक होत असते व झालीही आहे, याची दखल घ्यायला हवी.

(१)

शासन आणि शोषण या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. शासनामुळे शोषण होत असते व शोषणातून शासन केले जाते. पण, शासनाला जनकल्याणकारी मानून त्यातून होणाऱ्या शोषणाकडे दुर्लक्ष करण्याची प्रथा पाडली गेली आहे व शासन जनकल्याणकारीच असते अशी (गैर) समजूत करून घेऊन शासन अपरिहार्य असते व आहे, असे एक मूल्य प्रस्थापित केले गेले आहे. पण, जेव्हा शासनाच्या शोषणकारी स्वभावामुळे ते स्वातंत्र्याला घातक ठरण्याची स्थिती निर्माण झाली, तेव्हा शोषण नाकारण्यासाठी शासनाला चिकटून बसलेल्या शोषणाला भस्मीभूत करण्यासाठी शासनालाही जाळावे लागत असते, असा विचार अस्तित्वात आला व अशा तऱ्हेने शोषणमुक्तीसाठी अनुसरलेल्या क्रांतीच्या ज्वाळात शासनही जळत गेले आहे. हाच जगातल्या क्रांत्यांचा इतिहास आहे. मानवी प्रगतीचा हा इतिहास मानला जातो. पण, क्रांतीनंतर निर्माण झालेल्या परिस्थितीत जी नवी व्यवस्था निर्माण होत गेली ती राजकीय व्यवस्थाच राहिली. या व्यवस्थेतून जे जनकल्याणकारी शासन अस्तित्वात आले, ते देखील शोषण मुक्तीचे राहू शकले नाही. म्हणून, क्रांतीनंतरचे जनकल्याणकारी शासनही शोषणकारी शासन बनले. यामुळे राजकीय क्रांतीनंतरही शासनाकडून होणारे शोषण शिल्लकच उरले. अशा तऱ्हेने शासन आणि शोषण ती दोन्ही अजेय ठरत गेली आहेत व अजूनही जगात सर्वत्र अजेयच आहेत. स्वातंत्र्याच्या उद्दिष्टांना अनुसरून शासनाची कल्पना ज्यांनी केली, त्यांची ती कल्पना जरी जनकल्याणकारी मानली गेली, तरी ती शोषणाच्या स्वभावापासून वेगळी राहूच शकली नाही, ही एक वस्तुस्थिती आहे. म्हणून, जनकल्याणकारी राज्यव्यवस्थेत शोषणाची परिस्थिती कायम जरी राहिलेलीच असली, तरी तिला गोंजारत राहूनच राज्यशास्त्र (राज्य करण्याचे शास्त्र) अस्तित्वात ठेवले गेले आहे. अर्थात, ते शोषण मुक्तीच्या दृष्टीने स्वतःचे प्रयोजन सिद्ध करू शकत नाही व सिद्ध करू शकलेलीही

अनुक्रमणिका








नाही. तेव्हा राज्यशास्त्र कल्याणकारी करण्याचा जास्तीत जास्त किंवा आटोकाट प्रयत्न करूनही शोषण विरहित राज्यशास्त्र अस्तित्वात येणे शक्य झालेले नाही व शक्य होणारही नाही. हे स्पष्टच दिसते आहे !

(२)

स्वातंत्र्याला अनुरूप राज्यशास्त्र अस्तित्वात येऊ शकलेले नाही. तथापि, ते अस्तित्वात आणण्याचा प्रयत्न केला गेला. यातून जे काही हाती लागले त्यालाच 'स्वराज्य शास्त्र' (स्वातंत्र्यातले राज्यकरण्याचे व्यवस्था शास्त्र) म्हटले गेले आहे. 'स्व' आणि 'राज्य' हे दोन शब्द जोडून 'स्वराज्य' झाले आहे. पण, स्वतःचे म्हणजे कोण्या एका व्यक्तीचे राज्य नव्हे. म्हणून, स्वातंत्र्याच्या आस्थेवाईकांनी 'स्व'चा अर्थ शोधण्याचा प्रयत्न केला. हा अर्थ निर्दोष असावा म्हणून 'स्व'ला व्यापकतेत पाहिले गेले. यातून 'स्व' म्हणजे 'आत्मा' असा अर्थ लावला गेला. यामुळे स्वराज्य म्हणजे आत्म्याचे राज्य किंवा 'आत्मराज्य' म्हटले जाऊ लागले. (हा शब्द (स्व.) आचार्य जावडेकरांनीही स्वीकारला) तरीही यातून राज्याचा पुरस्कार करणे योग्य वा श्रेयस्कर मानले जाईल किंवा काय असा प्रश्न यातून निर्माण झालाच ! यासाठी 'स्वराज्यशास्त्र' घडवताना 'आत्मा' हा कोणाचेही शोषण करणारा नसतो, कारण तो मुळात 'निर्मळ' असतो, असे मानले गेले. यामुळे 'स्वराज्य' या शब्दाला 'आत्मौपम्य'तेच्या आशयातच म्हणजे जे दुसऱ्याला आपल्यासारखेच मानावे या विचारात बसवले यातूनच 'स्वराज्यशास्त्र' स्वीकारलेही गेले आहे. ग्रामीणांचे आत्मे या दृष्टीने सर्वसमावेशक व म्हणून व्यापक असतात, असे मानून 'ग्रामस्वराज्य' शब्दाची रचना झाली. यातून 'स्वराज्यशास्त्र' हे 'ग्रामस्वराज्या'च्या दिशेने जाणारे असावे किंवा ग्रामस्वराज्याचे स्वराज्यशास्त्र घडवणे व घडणे शक्य व्हावे असे मानले गेले ! एकूण काय तर स्वातंत्र्याला अनुरूप 'स्वराज्यशास्त्र' (स्वातंत्र्यातले राज्यशास्त्र) अस्तित्वात आणण्याचा जो प्रयत्न केला गेला तो शासनाची शोषणकारिता नाहीशी करण्याच्या हेतू मधलाच म्हणता येईल व म्हणायलाही हवाच ! यामुळे जर शासन आणि शोषण स्वातंत्र्यात असूच नये याचे नियोजन होऊ शकले तर ते स्वातंत्र्याला उपकारकच ठरेल. म्हणून, स्वातंत्र्याला अनुरूप 'समाजरचना' घडवण्याचा हा प्रयत्न व याचे अनेकविध उपक्रम महत्त्वाचेच मानता येतील. पण, 'स्वराज्यशास्त्र' आणि 'समाजरचना' या दोन वेगळ्या स्वतंत्र संकल्पना आहेत. या दोघांची सरमिसळ करणे योग्य नव्हे. पण, या दोघांच्या सरमिसळीतूनच सध्या तरी स्वातंत्र्याला अनुरूप स्वातंत्र्याची समाजरचना करण्याचा प्रयत्न होत असतो व होत आहे. अर्थात, 'स्वराज्यशास्त्र' व 'समाजरचना' या दोन्ही स्वातंत्र्याला अनुरूप ठेवण्याच्या प्रयत्नात शासन व शोषण या दोन जाणिवांना आश्रय मिळू नये याची खबरदारी घ्यावीच लागेल ! कारण, 'आत्मा' कितीही निर्मळ असला व तो तसा मानलाही गेला, तरी मनुष्य मनाच्या पातळीवर ज्या सहजतेने असतो व असू शकतो, तेवढ्याच सहजतेने आत्म्याच्या पातळीवर तो नसतो, हे मान्यच करायला हवे. म्हणून देहबुद्धीने मन जेवढे व्यापलेले असते, तसे व तेवढे आत्मौपम्यतेने व्यापलेले नसते. यामुळे आत्म्याच्या पातळीवरच माणसाला सदैव ठेवता येणे व माणसाला तसे राहता येणे शक्य होईलच याची खात्रीही देता येत नाही. अर्थात, 'आत्मा' आणि 'मन' या दोहोंमध्ये समन्वय घडवून आणणे तसे अवघडच असते व आहे. कारण, मनात संकल्प-विकल्प उठतात. आत्मा संकल्प-विकल्परहित असतो. मनाला देहबुद्धी प्रभावित करते. आत्म्याला ती प्रभावित करीत नाही. म्हणूनच माणसाला आत्म्याच्या पातळीवर कायम ठेवता येणे व ठेवले जाणे शक्य होईल याची खात्रीही देता येत नाही. अर्थात, संकल्प-विकल्पातल्या मनाला मनोविकार जडतात व मन विकारात गटांगळ्या घेत असते. शासन व शोषण हे दोन्ही मनोविकारच असल्यामुळे राज्यवादाची (स्टेटीझम्) बाधा मनाला होऊ नये म्हणून आत्म्यात माणसाला स्थिर करून ठेवणे गरजेचे असते. पण, हे आध्यात्मिक साधनेमुळेच शक्य होत असते. ही साधना राजकारणात राज्यशासनामुळे करता येईल किंवा काय हा एक प्रश्न आहे. पण, या दिशेने स्वातंत्र्याच्या

अनुक्रमणिका

चळवळीत विचार केला गेला होता एवढे मात्र निश्चित आहे. स्वातंत्र्याच्या चळवळीला गीतेच्या आध्यात्मातल्या कर्मयोगाचा आधार लोकमान्य टिळकांनी घेतला होता. (स्व.) गोपाळ कृष्ण गोखले यांनी तर राजकारणाचे आध्यात्मिकरण व्हावे, असे म्हटलेही होते. महात्मा गांधींनी या दिशेने प्रयत्न करून पाहिले होते. पण, ते तेवढेसे यशस्वी होऊ शकले नाहीत व राजकारण होते तसेच राहिले आहे. तेव्हा, मनाच्या पातळीवरचा मनुष्य स्वतःच्या आत्मस्वरूपास ओळखण्यास पात्र व्हावा हे स्वातंत्र्याच्या संकल्पनेत मान्य केले गेले आहे. पण, यातून 'समाजरचना' करण्याचा प्रश्न अद्याप शिल्लक उरलेलाच आहे, हे देखील मान्य करायला हवे!

(३)

स्वातंत्र्याला अनुरूप 'स्वराज्यशास्त्र' घडवता यावे किंवा ते घडावे, ही अपेक्षा करणे तसे योग्यच आहे. पण, याच्या मार्गात ज्या अडचणी येतात त्या माणसाला स्वातंत्र्यापासून वंचित ठेवणाऱ्या होतात हे लक्षात घेऊनच तशी काळजीही घ्यायला हवी. या दृष्टीने माणूस धर्म व संप्रदायांच्या कर्मकांडातल्या संस्कारांच्या बंधनात अडकून पडतो, त्यातून त्याची सुटका व्हावयाला हवी. ही सुटका करून घेण्यासाठी माणसाला संघर्षातच उतरावेही लागते. क्रांतीसाठी संघर्ष करावाच लागतो, हे मान्य झालेच आहे. पण, संघर्षात हिंसा होत असते, असे मानलेही गेले आहे. म्हणून, जगात ज्या क्रांत्या झाल्या त्यातून हिंसा वगळता आलेली नाही. यामुळे बहुतेक सर्वच क्रांत्या केवळ राज्यक्रांत्याच ठरलेल्या आहेत. क्रांतीचा 'मूल्य परिवर्तन' (चेंज ऑफ व्हॅल्यूज) हा मूळ अर्थ या राज्यक्रांत्यांमुळे झाकाळून गेला आहे किंवा क्रांती म्हणजे 'राज्यक्रांती' एवढा एकच संकुचित अर्थ विकृत होऊन शिल्लक उरू शकला आहे. क्रांती आणि राज्य अथवा राज्यवाद या दोहोंचा मुळातच मेळ बसणे अशक्य आहे, याचे भानच उरलेले नाही. तेव्हा, यातून माणसाची संस्कारबद्धता प्रामुख्याने उजळून निघते आहे. यासाठी अशा या संस्कारातून मुक्त होण्यासाठी संघर्ष करावयाचा असतो. कारण, संस्कार संदर्भ बदलतो त्यानुसार कुसंस्कार होत जातात याचे भान व्हावे लागते. हे भान करून देण्याचा प्रयत्न महात्मा गांधींनी व अलिकडच्या काळात जेपींनीच (जयप्रकाश नारायण) केला आहे. महात्मा गांधींनी सत्याग्रहाला संघर्षाच्या पातळीवर नेले होते. ती पातळी कुसंस्काराच्या मुक्तीतलीच राहावी याची काळजीही त्यांनी घेतलीच होती. जेपींनी क्रांतीसाठी संघर्ष अपरिहार्य मानले होते. म्हणून, त्यांनी राज्यक्रांत्यांना अपूर्णच मानले होते. जे अपूर्ण आहे ते क्रांतीचा द्रोह करणारेही असतेच असा त्यांचा पक्का समज झालेला होता. यातूनच संपूर्णतेकडे क्रांतीची संकल्पना जेपींनी ओढून घेतली होती. यालाच 'संपूर्ण क्रांती' (टोटल रेव्होल्यूशन) असे नामकरण त्यांनी केले होते. सामाजिक क्रांती, आर्थिक क्रांती, राजकीय क्रांती, सांस्कृतिक क्रांती, वैचारिक अथवा बौद्धिक क्रांती, शैक्षणिक क्रांती, आध्यात्मिक क्रांती या सात क्रांत्यांचा यात त्यांनी समावेश केला आहे. ('प्रीजन डायरी १९७५' वरून साभार) जेपी शब्दशास्त्री नव्हते असे शब्दशास्त्रींनी मानले होते. जेपींनी 'टोटल' या इंग्रजी शब्दाचा 'संपूर्ण' असा अर्थ लावला असावा, असे या शब्दशास्त्रींचे म्हणणेही होते. पण, तो अर्थ 'समग्र' असा असावयाला हवा होता अशी दुरुस्ती शब्दशास्त्रींनी केली होती. पण, 'समग्र' अर्थ घेतला तर अपूर्णतेकडून पूर्णतेकडे जाणे साधले जात नाही, असे जेपींना वाटले होते. अर्थात शब्दशास्त्री क्रांतिकारी नसतात असे यातून दिसून आले. 'समग्र' शब्द मानला तर त्याला 'संपूर्ण' शब्दाला जो अर्थ आहे तो अर्थ प्राप्त होत नाही. यामुळेच जेपींची 'संपूर्ण क्रांती' ही संकल्पना राज्यक्रांतीची अपूर्णता सिद्ध करणारी मानूनच ती त्यांनी महत्त्वाची मानलीही होती. याचा अर्थ असा की क्रांती केवळ राज्यक्रांती असून चालत नाही. कारण, स्वातंत्र्याला राज्यक्रांती बाधक व घातकही असते, हे जेपींना अभिप्रेत होते. म्हणून, 'क्रांती' हा शब्द स्वातंत्र्याच्या संदर्भातच स्वीकारणे जेपींनी आवश्यक मानले होते. पण, यावर अद्याप म्हणावे तसे विचार मंथन झालेले नाही. ते मंथन व्हावे या दृष्टीने पुरेसा अवधी मिळायला हवा होता तो जेपींना मिळालाच नाही. या दृष्टीने त्यांचे अकाली निधन झाले असेच म्हणायला हवे. अकाली निधन याचा अर्थ

कालसापेक्षच या ठिकाणी घ्यायला हवा. कारण, जेपींना 'संपूर्ण क्रांती' हा शब्द सुचला तेव्हा ते आयुष्याच्या अंतकाळा निकट जाऊन पोहोचलेले होते. यामुळे ते फक्त 'संपूर्ण क्रांती'चा उच्चारच करू शकले होते. पण, राज्यक्रांतीचा अपुरेपणा व यात अंतर्भूत असलेला स्वातंत्र्याला विघातक आशय या दोन्हींचे साधार विवेचन व विश्लेषण करण्याचे त्यांच्याकडून राहून गेले. यासाठी त्यांना प्रयोगसिद्धता करण्यासाठी पुरेसा वेळ मिळाला नाही.

(४)

स्वातंत्र्याचा अर्थ उलगडत जाण्यासाठी स्वातंत्र्याला अनुरूप समाजरचनेची नितांत गरज आहे. हे जाणूनच स्वातंत्र्याच्या चळवळीची निरंतर प्रक्रिया चालवायचीही असते! पण, या दृष्टीने जी सक्रियता अपेक्षित असते व आहे, त्याचा अभाव मात्र यावेळी अतिशय जाणवत आहे. हे इतके जाणवत आहे, की स्वातंत्र्याची जाणीवच पुसून टाकली जात असावी किंवा पुसलीच गेली असावी, असे वाटणेच स्वाभाविक होऊन बसते. याचे एक प्रमुख कारण असे दिसते की, जनकल्याणकारी (वेलफेअर स्टेट) राज्यव्यवस्था ही स्वातंत्र्याची हमी देणारी आहे, असा समज करून घेतला गेला आहे. हा समज राज्यवाद्यांनीच (स्टेटिझम) प्रयत्नपूर्वक करून दिलाही आहे. म्हणून, स्वातंत्र्याला राज्यवादच सर्वात मोठा अडथळा आहे, व हे स्वातंत्र्यापुढचे मोठे अरिष्टही आहे; हे लक्षात घेतल्याशिवाय यापासून मानवजातीची मुक्तता व्हावयाचीही नाही. याची जाणीव स्वातंत्र्याच्या चळवळीत व्यक्तिगत सत्याग्रहाच्या काळात १९४० साली विनोबांनी या देशाला व जगाला सर्वप्रथम करून दिली होती. अर्थात, याचे विस्मरण झाले व म्हणून ते उपेक्षितच राहिलेही आहे.

१९४० साली महात्मा गांधींनी विनोबांची प्रथम सत्याग्रही म्हणूनच निवड केली होती. या निमित्ताने पवनार आश्रमाच्या निकटच्या गावातून त्यांनी व्याख्याने दिली व नंतर त्यांना ब्रिटिश सत्तेने तुरुंगात टाकले होते. विनोबांची व्याख्याने 'युद्धविरोधी सत्याग्रह' या संदर्भातली होती. तुरुंगातून सुटून आल्यावर याच क्रमातले शेवटचे व्याख्यान विनोबांनी २५.०५.४२ ला वर्धा शहरात दिले होते. अर्थात ते आजही लक्षात घेण्यासारखे आहे. व्याख्यानाचा शेवट करताना ब्रिटिश साम्राज्यवादाला उद्देशून त्यांनी म्हटले होते की, "जगात व्यवस्थापकांची रांग लागलेली आहे ते एक लोकांच्या गळ्याला घातलेला प्राणघातक गळफासच आहे. जगातले सगळे व्यवस्थापक जर आपल्या जागेवरून दूर झाले तर जगात शांती नांदेल व मानवतेचे कल्याण होईल."

(हिन्दी मासिक 'मैत्री' वर्ष पंचवीस अंक अकरावा १५ नोव्हेंबर १९८८ विशेषांकाच्या सौजन्याने)

विनोबांची दुसऱ्या महायुद्धाकाळची युद्ध विरोधी व्याख्याने प्रथम सत्याग्रही या नात्याने मराठी भाषेतच विनोबांनी दिली होती. याची विशेष दखल महात्मा गांधींनी त्यांच्या 'हरिजन' पत्रात प्रसिद्धी देऊनच घेतलीही होती. यावेळी या व्याख्यानांचा अभ्यास करताना लक्षात येते की, साम्राज्यवादाच्या विरोधात राज्यवादाचे खंडण करूनच स्वातंत्र्याची उपासना करण्याचा आग्रह विनोबांनी धरलेला होता. यातूनच त्यांनी स्वातंत्र्यातली व्यवस्था राज्यवादाचा पुरस्कार करणारी नसावी, याचे भान करून दिले होते. त्यांनी अराज्यवादाचा (स्टेटलेस) पुरस्कार करण्यासाठी 'ग्रामस्वराज्य' साकारावे म्हणून भूदान-ग्रामदानाची चळवळही आरंभलेली होती. याच्या यशापयशाची चर्चा बौद्धिक पातळीवर या देशात बरीच झालेली आहे. पण, विनोबांचा व्यक्तविलेला दृष्टिकोण व त्यातली विचारधारा स्वातंत्र्याचा अर्थ उलगडवून दाखवणारी होती, एवढे मात्र आवर्जून लक्षात घ्यायला हवे. कारण, याचे उपक्रम विनोबा व जेपी या दोघांशिवाय अन्य कोणीही राजकीय स्वातंत्र्याच्या प्रदीर्घ काळात या देशात चालवलेलेच नाहीत. ही एक इतिहास सिद्ध वस्तुस्थिती आहे.

(५)

कम्युनिस्ट वा बोल्शोविक क्रांतीतून निर्माण झालेली व्यवस्था असो, भांडवलशाहीच्या प्रेरणा व

कर्तृत्वातून निर्माण झालेली लोकशाहीचे नाव धारण करणारी व्यवस्था असो किंवा भारतासारख्या राष्ट्रात स्वातंत्र्याच्या अनत्याचारी सत्याग्रहातून अस्तित्वात आलेली स्वराज्याची व्यवस्था असो, अशा सर्वच व्यवस्थांची एक अशी मर्यादा येऊन ठेपली आहे की, पुढचे पाऊल टाकून स्वातंत्र्यात वाटचाल करणेच अशक्य होत असल्याचे दिसते आहे. कारण, जगातल्या या सर्वच व्यवस्था मनुष्यद्रोही प्रवृत्तींच्याच राहिलेल्या व राहू शकलेल्या आहेत. म्हणून, जनकल्याणाचा पुरस्कार करूनही या व्यवस्था शोषण प्रक्रियेतून लोकांना मुक्त करू शकत नाहीत. एवढेच नव्हे तर यांच्या राज्यशासनाकडूनही लोकांचे शोषण केलेही जाते आहे! याच्या प्रतिक्रियेतूनच व्यवस्थेतल्या अंतर्विरोधांना (इनर कॉन्ट्र्याडिक्शन) चालना मिळालेली आहे. म्हणून, या अंतर्विरोधामुळे जगातल्या सर्वच व्यवस्था तुटून पडण्याच्या स्थितीला येऊन पोहोचलेल्या आहेत. याच्या प्रस्तुतीतूनच दहशतवादाला संधी उपलब्ध झाली असून जागतिक पातळीवर त्याचे थैमान दिसून येते आहे. हे अमानवीयतेतलेच असल्यामुळे लोकांना स्वातंत्र्यात जगण्याची उमेदच वाटेनाशी झालेली आहे. पण, स्थानिक, राष्ट्रीय व जागतिक पातळीचा दहशतवाद हा राज्यवादाच्या अतिरेकातून जन्मलेला आहे, हे सामान्यतः लक्षातच घेतले जात नाही! राज्यवादाच्या अतिरेकातूनच राज्याचा दहशतवादही (स्टेट टेरेरिझम्) अस्तित्वात येतो आहे, हे सहसा लक्षातच येत नसावे. स्वतंत्र भारतात अलिकडेच गुजराथ राज्यामध्ये मुस्लिम विरोधी राज्याच्या दहशतवादाचे स्वरूप प्रकट झाले व ते अतिरेक्यांच्या दहशतवादा इतकेच दुष्परिणामी, घातक व मनुष्यद्रोही ठरलेले आहे. तेव्हा, जगातल्या सर्वच राज्यव्यवस्थांना मनुष्यद्रोही स्वरूप येणेच स्वाभाविक झाल्यामुळे व राजकीय व्यवस्था मनुष्य द्रोहापासून वेगळी होण्याची शक्यता नसल्यामुळे अंतर्विरोधाने तुटून पडणाऱ्या व्यवस्थांमधून पुढे काय निष्पन्न होण्याची शक्यता आहे, या विषयी खात्रीपूर्वक काहीही सांगता येत नाही. अशा जागतिक परिस्थितीत दहशतवाद मानवी विनाशाला कारणीभूत ठरू शकेल हे निश्चित आहे. तरीही राज्याच्या दहशतवादातून मुक्त होण्याची कर्तबगारी तर लोकांनाच करावयाची आहे! म्हणून, राज्यावलंबी लोकजीवन स्वतंत्र व स्वावलंबी कसे होईल याचाच विचार करायलाही हवा! कल्याणकारी राज्याची कल्पना करणारे लोकशाहीचे समर्थक आस्थेवाईक राज्याच्या शोषणकारी स्वभावाकडे दुर्लक्ष करीत असल्यामुळे कल्याणकारी राज्यदेखील अंततोगत्त्वा दहशतवादाकडेच जात असते हे जगातल्या अनेकानेक उदाहरणावरून सिद्ध करता येऊ शकते. म्हणून, राज्यवादाचा पुरस्कार करून स्वातंत्र्यात जगणे यापुढे जगातल्या लोकजीवनाला शक्यच होणार नाही, अशी एक जागतिक परिस्थिती निर्माण होत आहे. अशा वेळी स्वातंत्र्यात जगण्याची नवी समाजरचना घडवून आणण्याचा पर्यायच शोधावा लागणार आहे. म्हणून, याची कल्पना करायला हवी! याचे जे काही अवशेष जगात तुटल्याफुटल्या व विस्कळीत अवस्थेत विखरून पडलेले दिसतात तेच सांधावे लागणार आहेत. हे अवशेष जगात शिल्लक उरलेले नक्कीच आहेत. भारतातल्या ग्रामीण लोकजीवनात ते प्रत्यक्ष दिसून येतही आहेत व दिसून येतात. म्हणून, लोकजीवनाचे ग्रामीण स्वरूपच स्वातंत्र्यात जगण्याच्या दृष्टीने उपकारक ठरू शकेल. नागरी जीवन जगण्याला असह्य होऊन टाकाऊ ठरत जाईल. याचीच लक्षणे दिसतही आहेत!

अर्थात, यापुढे स्वातंत्र्यात जगण्याची नवी दिशाच धरावी लागणार आहे!










## काल, आज आणि उद्या

# आक्रस्ताळी राजकारण आणि आणीबाणी

साक्षी

दर वर्षी जून महिन्यात येणाऱ्या पावसाची आतुरता वाटू लागते त्याच बरोबर पंचाहत्तर साली जूनमध्येच पुकारलेल्या आणीबाणीची आठवण हटकून येते. खरेतर त्या घटनेला आता चौतीस वर्षे झाली आहेत. आणीबाणीच्या सुमारास जन्माला आलेली पिढी आता कर्ती झाली असून देशाच्या भवितव्याची घडण करीत आहे. तथापि आणीबाणीच्या योगाने देशातील जनतेत जी अस्वस्थता निर्माण झाली; देशाच्या भवितव्याविषयीची जी घोर चिंता लोकांना घेरून बसली; विचार व त्यांची अभिव्यक्ती यांच्यावर जी जाचक बंधने आली आणि त्यामुळे गुदमरून व घुसमटून गेल्याची भावना निर्माण झाली; राज्यकर्त्यांच्या बेफाम वर्तनाविषयी कर्णोपकर्णी सांगितलेल्या बातम्या किंवा अफवा, रात्र झाल्यावर टोळक्या-टोळक्यातून चाललेली कुजबूज, हातात अचानक सरकवून दिलेली पत्रके आणि क्वचित प्रसंगी सत्याग्रह्यांनी घोषणा देत छाती ठोकपणे पत्करलेली कैद यामुळे जनमानसाला थरकावून टाकणाऱ्या लहरींनी भारावलेले वातावरण; अशा गोष्टींची काहीच माहिती या पिढीला नाही. दर वर्षी २५-२६ जूनला अग्रलेख किंवा प्रमुख लेख लिहून वर्तमानपत्रे वाचकांना आणीबाणी म्हणून काही प्रसंग होऊन गेला याची आठवण करून देत असतात; परंतु, वर्तमानपत्रे, विशेषतः त्यातील लेख, वाचणे हा प्रघात आता संपून गेला आहे. त्यामुळे आणीबाणी या घटनेचा अंतर्मुख होऊन विचार करावा, असे फारसे घडत नाही. ज्यांनी आणीबाणीचा अनुभव घेतला व हिरिरीने तिचा पुरस्कार किंवा विरोध केला असे लोकही आणीबाणीमुळे देशाच्या इतिहासाला काही परिणामकारक वळण लागले, असे मानताना दिसत नाही. त्सुनामीमुळे झालेली हानी काही लोकांच्या जीवनात उत्पात घडवून गेली, पण त्सुनामीमुळे इतिहासाची क्रमणाच वेडीवाकडी होऊन गेली असे आपण ज्याप्रमाणे मानत नाही त्याचप्रमाणे आणीबाणीही एक उद्रेकी घटना घडून गेली पण देशाच्या राजकारणावर तिने आपली मुद्रा उमटविली असे कोणी मानते आहे, असे दिसत नाही. तथापि, आता इतक्या वर्षानंतर आणीबाणीचा खोल विचार केला. तर आणीबाणीमुळे देशाच्या राजकारणावर दीर्घकालीन परिणाम झाले, ती केवळ एक अगंतिक घटना नव्हती, असे आढळेल.

(१)

२५-२६ जून १९७५ च्या मध्यरात्री त्या वेळच्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी राष्ट्रपती फक्रुद्दिन अली अहमद यांच्या करवी अंतर्गत आणीबाणीची घोषण करविली. डिसेंबर १९७१ मध्ये बांगला देशाच्या निमित्ताने झालेल्या लढाईच्या वेळी पुकारलेली बाह्य आक्रमणाच्या संदर्भातील आणीबाणी (एक्स्टर्नल इमर्जन्सी) त्या वेळी अस्तित्वात होतीच. भारत-संरक्षण निर्बंध (डिफेन्स ऑफ इंडिया रूल्स) व अंतर्गत सुरक्षा कायदा (मेंटेनन्स ऑफ इंटर्नल सेक्युरिटी ॲक्ट) हे प्रभावी कायदे शासनाच्या हाती होतेच. पण श्रीमती गांधी यांनी दि. २६ जून रोजी सकाळी आकाशवाणीवरून केलेल्या भाषणात असा दावा केला की, विरोधी पक्षीयांच्या घटनाबाह्य आंदोलनामुळे देशात असाधारण परिस्थिती निर्माण झाली आहे व ती नियंत्रणात आणण्यासाठी अंतर्गत आणीबाणीची (इंटर्नल इमर्जन्सी) जालीम उपाय-योजना करावी लागत आहे.

आणीबाणीची घोषणा करताना श्रीमती गांधींच्या मनात नेमकी कोणती प्रेरणा, योजना किंवा भीती होती व पुढे १७ जानेवारी १९७७ रोजी विरोधी पक्षांच्या पुढाऱ्यांना तुरुंगातून सोडून त्यांनी निवडणुकांची घोषणा केली तेव्हा कोणते आडाखे त्यांनी बांधले होते याची चर्चा अभ्यासक कायमच करत

अनुक्रमणिका

राहातील. परंतु अशा चर्चेला आधारभूत ठरतील असे अधिकृत कागदपत्र अद्याप उपलब्ध झालेले नाहीत. श्रीमती गांधींचा खासगी पत्रव्यवहार, रोजनिश्या व टिपणे अद्यापि गुप्ततेच्या गोषातच बंदिस्त आहेत. त्यामुळे आणीबाणीची चर्चा ही तर्क-वितर्कांचे पंख लावून अधांतरीच राहिलेली दिसते.

आणीबाणीनंतर, जनता पक्षाच्या कारकिर्दीत, आणीबाणीतील हकीकती सांगणारी पुष्कळ पुस्तके प्रसिद्ध झाली. आणीबाणीत वर्तमानपत्रांवर निर्बंध होते, आकाशवाणीवर सरकारी प्रचार चालू होता आणि दूरचित्रवाणीवर फक्त सरकारी वाहिनीच दिसत असे. त्यामुळे काय घडत होते हे लोकांना कळत नव्हते. फार मोठी दडपशाही व अत्याचार झाले, असा वहीम मात्र होता. आणीबाणीतील खऱ्या खोट्या जुलुमांच्या कथा ऐकण्याची अतोनात उत्सुकता लोकांना होती. साहजिकच आणीबाणीच्या, तिखटमीठ कालवून चटकदार केलेल्या, वृत्तांतांची एक सुगीच त्या काळात आली. आणीबाणीचा गांभीर्याने विचार करताना या पुस्तकांचा उपयोग तारतम्यानेच करावा लागतो. ही लाट ओसरल्यानंतर गेल्या १०-१५ वर्षांत आणीबाणीच्या काळातील घडामोडींची अधिक संतुलित माहिती देणारी पुस्तके त्या काळात जबाबदारीच्या पदावर काम करणाऱ्या व्यक्तींनी लिहिली आहेत. पी. एन्. धर (श्रीमती गांधींच्या कार्यालयातील प्रधान-सचिव), एन्. के. शेषन् (श्रीमती गांधींचे प्रधान वैयक्तिक सचिव), बी. एस्. टंडन (श्रीमती गांधींच्या कार्यालयातील प्रसिद्धी अधिकारी), बी. के. नेहरू (भारताचे इंग्लंडमधील उच्चायुक्त) यांनी आपल्या आठवणी लिहिल्या आहेत. श्री. मधू लिमये यांनी आपल्या दृष्टिकोणातून आणीबाणीचा आढावा घेतला आहे. मोरारजी देसाई यांचे आत्मचरित्रही महत्त्वाचे आहे. भारतीय कम्युनिस्ट पक्ष (भाकप) हा श्रीमती गांधींचा प्रमुख साह्यकर्ता पक्ष होता. त्या पक्षाचे नेते राजेश्वर राव आणि मोहित क्षेत्र यांची (अनुक्रमे) 'इमर्जन्सी ॲण्ड कम्युनिस्ट पार्टी' व 'द हिस्टरी ऑफ द कम्युनिस्ट मुव्हमेंट १९२५-९५' ही पुस्तके उपलब्ध आहेत. खेरीज सोव्हिएट युनियनच्या गुप्तचर खात्याचे कागदपत्र प्रकाशात आले असून त्यातून आणीबाणीच्या काळातील भारत-सोव्हिएट युनियनच्या संबंधावर प्रकाश पडतो.

साम्यवादी विचारवंत ही इतिहास-अभ्यासकातली एक लक्षणीय जमात आहे. आणीबाणी, श्रीमती गांधींचे राजकारण, आणीबाणीत झालेली दडपशाही याविषयी अभिजनवर्गात एकेकाळी खदखदत असणारा कडवटपणा यथाकाळ निवळू लागल्यानंतर आपल्या विशिष्ट, अभ्यासपूर्ण व लाघवी शैलीने या अभ्यासकांनी आणीबाणीविषयी नव्याने मांडणी करण्यास सुरुवात केली आहे. याच जमातीचे मराठी वृत्तव्यावसायिक इंदिरा गांधींच्या कारकिर्दीवर उठलेला आणीबाणीचा कलंक कसोशीने धुवून काढण्याचा, निदानपक्षी तो फिक्का करण्याचा प्रयत्न करीत असतात, अशा साम्यवादी अभ्यासकांपैकी प्रा. बिपनचंद्र हे एक आहेत. ते जवाहरलाल नेहरू विद्यापीठात इतिहास शिकवीत असत. निवृत्त झाल्यानंतर 'समकालीन इतिहास'चा अभ्यास करणारा एक गट त्यांनी त्या विद्यापीठात स्थापन केला आहे. त्यांनी 'इन् द नेम ऑफ डेमॉक्रसी : जेपी मूव्हमेंट अँड इमर्जन्सी' या नावाचे पुस्तक लिहिले आहे. पुस्तकात त्यांनी आवर्जून सांगितले आहे की, श्रीमती गांधी यांना दोषमुक्त करण्यासाठी या पुस्तकाचे लेखन झालेले नाही. तरीही पुस्तक वाचल्यावर कोणासही असे वाटल्यावाचून राहाणार नाही की, विरोधकांनी पंतप्रधानांना आणीबाणी लादण्यास भाग पाडले, असेच लेखकाला सांगावयाचे आहे.

(२)

आणीबाणी संपल्यानंतर ताबडतोब जी पुस्तके लिहिली गेली त्यामध्ये आणीबाणीच्या प्रसंगाला १२ जून १९७५ या दिवसापासून आरंभ झाला असे सांगण्यात येते. त्या दिवशी अलाहाबाद उच्च न्यायालयातील न्यायमूर्ती जगमोहन सिन्हा यांनी राजनारायण (श्रीमती गांधींच्या विरोधात १९७१ च्या निवडणुकीत उभे असलेले उमेदवार) यांनी श्रीमती गांधींच्या निवडीवर आक्षेप घेणारा जो अर्ज केला होता, त्या अर्जाचा निवाडा जाहीर केला. या अर्जात दोन आक्षेप राजनारायण यांनी घेतले होते. एक, इंदिरा

गांधींचे एक प्रचारक यशपाल यांनी सरकारी नोकरीत असताना इंदिरा गांधींचा प्रचार केला; व दोन, श्रीमती गांधी यांच्या प्रचारासाठी उत्तर प्रदेशराज्याची शासन यंत्रणा वापरली गेली. इतरही आक्षेप होते; पण हे दोन आक्षेप पुराव्यानिशी सिद्ध होतात, असे सिन्हा यांचे मत पडले. या अपराधाबद्दल सिन्हा यांनी इंदिरा गांधी यांची निवड तर रद्द ठरविलीच, पण पुढील सहा वर्षे त्या निवडणूक लढविण्यास अपात्र आहेत असेही घोषित केले. इंदिरा गांधी यांना सर्वोच्च न्यायालयात दाद मागण्यासाठी अवधी मिळावा या हेतूने सिन्हा यांनी वीस दिवसांसाठी आपल्या निवाड्याची अंमलबजावणी स्थगित ठेवली.

सिन्हा यांनी इंदिरा गांधींच्या विरुद्ध निर्णय देऊ नये यासाठी त्यांच्यावर खूप दडपणे आली, अशी माहिती कुलदीप नायर देतात. बिपनचंद्र यांच्या लिहिण्याचा झोक असा आहे की, हा निर्णय समजूतदारपणाचा नव्हता. आजही काही अभ्यासक असे प्रतिपादतात की, इंदिरा गांधी यांनी राजनारायण यांचा सणसणीत पराभव केला होता. वरील सारखे किरकोळ नियमभंग झाले नसते तर राजनारायण यांनी इंदिरा गांधींचा पराभव केला असता असे म्हणणे वस्तुस्थितीला धरून होणार नाही. सारांश, सिन्हा यांनी या किरकोळ गोष्टींकडे दुर्लक्ष करणे शहाणपणाचे ठरले असते. तथापि, हे सर्व विद्वान न्या. सिन्हा यांच्या निवाड्यातील एका मुद्याकडे दुर्लक्ष करीत असतात. सिन्हांनी असे म्हटले होते की, लोकप्रतिनिधी–कायद्यात कोणत्याही गुन्ह्याला एकच शिक्षा, तारतम्य न बाळगता, सांगितली आहे. ती म्हणजे निवड रद्द करणे आणि पुढील सहा वर्षे निवडणूक लढविण्यास बंदी करणे. त्यामुळे हे नियमभंग दुर्लक्षणीय मानले तरी हीच शिक्षा द्यावी लागत आहे. बरे, हे गुन्हे सिद्ध झाले नव्हते, असेही म्हणता येत नाही. श्रीमती गांधींनी सर्वोच्च न्यायालयात दाद मागितली आणि सिन्हांच्या निकालाला बिनशर्त स्थगिती द्यावी अशी याचना केली. जे पुरोगामी आणि परिवर्तनवादी म्हणून प्रसिद्ध होते अशा न्या. कृष्ण अय्यर या न्यायाधीशांनी निरपवाद स्थगिती दिली नाही. २४ जून १९७५ रोजी दिलेल्या निकालात न्या. अय्यर यांनी म्हटले होते की, इंदिरा गांधी या पंतप्रधान म्हणून राहू शकतात; पण त्या लोकसभेच्या कामकाजात भाग घेऊ शकणार नाहीत, मतदान करू शकणार नाहीत व संसदेच्या सभासदांना मिळणारा भत्ताही त्यांना मिळणार नाही. याचा अर्थ असा की, इंदिरा गांधींच्या मूळ याचिकेचा निवाडा होईपर्यंत त्या लोकसभेच्या (व म्हणूनच संसदेच्या) सभासद नाहीत.

संसदेची सभासद नसणारी व्यक्ती देखील ६ महिन्यांपर्यंत मंत्री राहू शकते, या तरतुदीनुसार त्या (इंदिरा गांधी) पंतप्रधान म्हणून राहू शकतात. यावरून असे दिसते की, इंदिरा गांधींची लोकसभेवर झालेली निवड सकृद्दर्शनी संशयास्पद आहे, हे अय्यर यांना मान्य होते.

१२ जून १९७५ रोजी सिन्हांनी इंदिरा गांधींच्या विरोधात निकाल दिल्यापासून भाकप हा पक्ष वगळता इतर विरोधी पक्षांनी इंदिरा गांधींच्या राजीनाम्याची मागणी कर्कशपणे करायला सुरुवात केली होती. पण त्यासाठी त्यांनी आंदोलन सुरू केले नव्हते. सर्वोच्च न्यायालयाचा निर्णय २४ जूनला आल्यानंतर मात्र त्यांनी ३० जूनपासून आंदोलन करण्याचा निर्णय घेतला. २५ जूनला विरोधी पक्षांच्या जनमोर्चाने दिल्लीत रामलीला मैदानावर एक विराट सभा घेतली. तेथील भाषणात जयप्रकाश यांनी श्रीमती गांधी यांना अंतिम इशारा दिला की, त्यांनी चार दिवसात राजीनामा द्यावा; नाहीतर जनता त्यांच्या सरकारची मान्यता काढून घेईल. लष्कराने व मुफ्ती नोकरांनी सरकारचे हुकूम मानू नयेत, असे आवाहन जयप्रकाश यांनी केले. जगजीवन राम व यशवंतराव चव्हाण या ज्येष्ठ मंत्र्यांनी इंदिरा गांधींच्या राजीनाम्याची उघडपणे मागणी करावी, असा सल्लाही त्यांनी दिला. या सभेत जयप्रकाश व मुरारजी देसाई या दोघांनीही असा आरोप केला की, इंदिरा गांधी या फॅसिस्ट आणि हुकूमशाही मार्गांचा अंगिकार करत आहेत.

२५ जूनलाच विरोधी पक्षांनी लोकसंघर्ष-समितीची स्थापना केली. मुरारजी देसाई हे समितीचे अध्यक्ष होते, तर नानाजी देशमुख हे सचिव होते, या समितीने आंदोलनाचा जो कार्यक्रम आखला होता त्याचा सारांश देसाई यांनी ओरियाना फॅ[illegible] नावाच्या






इटालियन स्त्री–वार्ताहराला त्याच दिवशी संध्याकाळी सांगितला. त्या कार्यक्रमाचा मुख्य भाग असा होता की, हजारो लोकांनी पंतप्रधानांच्या निवासाला वेढा घालून पंतप्रधानांच्या राजीनाम्याची मागणी करीत रात्रंदिवस बसून राहायचे. श्रीमती गांधींची हुकमतच या वेढ्यामुळे संपुष्टात येणार होती. "पोलिस आमचे काय करतील? जेव्हा प्रेतांचा खच पडेल, तेव्हा पोलिस त्या प्रेतांचे काय करतील?" असा प्रश्न विचारून मोरारजी पुढे म्हणाले की, "श्रीमती गांधींनी एकतर राजीनामा द्यावा किंवा आज रात्रीच आमचा निकाल लावावा. पण आज रात्रीच आम्हाला अटक झाली तर देशात व परदेशात मोठा गहजब होईल आणि श्रीमती गांधींची हुकुमशाही वृत्ती चव्हाट्यावर येईल. आपण लोकशाहीवादी आहोत, ही आपली प्रतिमा जपण्याचा त्यांचा प्रयत्न असतो, त्यामुळे त्या असे करणार नाहीत." येथे हे सांगणे जरूर आहे की, हे आंदोलन ३० जून पासून, म्हणजे आणखी ५ दिवसांनी सुरू होणार होते.

(४)

ही हकीकत देऊन बिपनचंद्र सांगतात की, श्रीमती गांधींनी या होऊ घातलेल्या आंदोलनाची गंभीर दखल घेतली. आपल्या घराला वेढा घालण्याची योजना व जयप्रकाशांनी लष्कराला दिलेली चिथावणी यामुळे त्या अस्वस्थ झाल्या. लाखो लोकांनी घातलेला वेढा उठवावयाचा झाला तर लष्कर व निमलष्करी दले यांचा उपयोग करणे भाग पडणार होते व नेमके तेच इंदिरा गांधी यांना नको होते. शिवाय, श्रीमती गांधींनी असाही विचार केला की, त्यांच्या राजीनाम्याची मागणी ही दिल्ली व इतर मोठ्या शहरातील लोकांकडून होत होती. ग्रामीण हिंदुस्थान, दक्षिण व पश्चिम भारत येथील लोकांचा त्यांना असलेला भरघोस पाठिंबा कायम होता. अशा स्थितीत या थोड्या लोकांनी बहुसंख्य लोकांवर चालविलेली कुरघोडी आपण चालू द्यायची का? तिसरा भाग हा की, श्रीमती गांधींनी राजीनामा दिला असता तर जगजीवन राम किंवा यशवंतराव चव्हाण यापैकी कोणाला तरी पंतप्रधान करावे लागले असते. जगजीवन रामांची भ्रष्टाचारी म्हणून ख्याती होती. त्यांनी कित्येक वर्षे आयकर–विवरण–पत्र दाखल केले नव्हते. अशा मनुष्याला हुलीवर चढलेल्या विरोधकांनी टिकू दिले असते का? श्रीमती गांधींच्या मनात या कसोटीच्या वेळी काय विचार चालले असावेत याचा बिपनचंद्र यांनी केलेला हा अंदाज आहे.

श्रीमती गांधी यांच्या मनातील आंदोलनां-विषयी त्यांच्या कचेरीचे प्रमुख असलेले श्री. धर यांनी बांधलेले आडाखे अधिक विश्वसनीय असण्याची शक्यता आहे. त्यांचा, या काळात, श्रीमती गांधींशी रोजचा संबंध होता. महत्त्वाचे कागदपत्र श्री. धर यांच्या डोळ्याखालून जात होते. श्रीमती गांधींना ह्या दिवसात कोण भेटत होते याची माहिती धर यांना होती; या भेटीत काय विचारविनिमय चालत असे हेही त्यांना हस्ते-परहस्ते समजत असले पाहिजे. ते सांगतात की, विरोधकांनी ज्या आक्रस्ताळेपणाने व भडकपणे पंतप्रधानांच्या विरोधात प्रचार चालविला होता त्यामुळेच त्यांचा आपल्या पदावर राहाण्याचा निश्चय दृढावत गेला. दुसरे असे की, त्यांना काँग्रेसपक्षाविषयी विश्वास वाटत नव्हता. त्यांच्या नेतृत्वावर पूर्ण विश्वास व्यक्त करणारा ठराव पक्षाने केला होता खरा, पण आपण सत्तेवरून दूर झालो तर आपला वारसदार आपल्याला पुनः सत्तेवर येऊ देणार नाही, आपल्या कारभारातील–विशेषतः संजयच्या संबंधातील–गलिच्छ प्रकरणे उघड्यावर आणून आपल्याला बदनाम करील, अशी भीती त्यांना वाटत होती. या झाल्या व्यक्तिगत काळज्या. राजकारणाविषयी त्यांना चिंता वाटत होती ती अशी की, आपण पुढारीपण सोडले तर काँग्रेसमध्ये फूट पडेल व अशी फूट पडली की, विरोधक सत्ता बळकावतील. विरोधी पक्ष सत्तेवर येण्याइतकी विनाशकारी स्थिती दुसरी कोणतीच नाही. थोडक्यात, देशावर फक्त काँग्रेसपक्षच राज्य करू शकतो आणि काँग्रेसचा गोवर्धन फक्त आपणच हातावरून वाहून नेऊ शकतो असा श्रीमती गांधींचा आत्मसमर्थक युक्तिवाद होता.

श्रीमती गांधींना सतत असे वाटे की, आपल्या विरोधात चाललेल्या आंदोलनाला परकीय शक्तींचा पाठिंबा आहे. याच सुमारास चिलीतील, लोकशाही मार्गाने निवडून आलेले पुरोगामी समजले गेलेले, राष्ट्राध्यक्ष आयांद यांना एका सत्तांतरात पदच्युत

अनुक्रमणिका






करण्यात आले व नंतर त्यांचा जीव घेण्यात आला. या सत्तांतरामागे अमेरिकेची फूस होती व बहुराष्ट्रीय कंपन्यांचा पैसा होता. जॅक ॲण्डरसन नावाचा अमेरिकन पत्रकार दिल्लीतील घडामोडींविषयी लेख लिहीत असे. त्या लेखांवरून श्रीमती गांधींनी अशी धास्ती घेतली होती की, अमेरिकेचे हस्तक आपलीही आयांदसारखीच दशा करतील. या उलट जयप्रकाश व त्यांच्या नेतृत्वाखाली गोळा झालेले विरोधी पक्ष यांचा दावा असा होता की, 'भाकप' व 'भाकप'ने काँग्रेसमध्ये सोडलेले हस्तक यांच्या वाढत्या प्रभावामुळे श्रीमती गांधी सोव्हिएट युनियनच्या आहारी जात होत्या. (अलिकडे सो. यु. च्या गुप्तचर खात्याची कागदपत्रे प्रसिद्ध झाली. त्यावरून असे दिसले की, रशियन गुप्तचर खाते काँग्रेसपक्षाला पैसे पुरवीत असेच पण श्रीमती गांधींना खुशीत ठेवतील असे देखणे तरुण त्यांच्या अवती भवती राहातील अशी तरतूद करीत असे.) विरोधकांच्या या आरोपाला काही आधारही होता. श्रीमती गांधी सो.यु.च्या कोणत्याही निंद्य कृत्याविषयी नापसंती व्यक्त करीत नसत. झेकोस्लोव्हाकीया व पोलंड येथील लोकशाहीवादी चळवळींनी जोर पकडताच सो.यु.ने आपले सैन्य त्या देशात घुसविले व चळवळी चिरडून टाकल्या. पण या दडपशाहीची निर्भत्सना पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी कधी केली नाही.

हे सर्व लक्षात घेतले तर असे म्हणावे लागते की, श्रीमती गांधी यांची मनोवस्था कोंडीत सापडलेल्या माणसाच्या मनोवस्थेसारखी झाली होती. काँग्रेस पक्षाविषयीचा अविश्वास, परकीय हस्तकांची धास्ती, विरोधी पक्षियांची आक्रमक चळवळ अशा अनेक उलाघालींनी त्यांना बेचैन व भयभयीत करून सोडले होते. त्यांच्या याच मनस्थितीचा फायदा घेऊन त्यांचे पाठीराखे त्यांना सत्तेवर राहाण्याचा आग्रही सल्ला देत होते. इंदिरा गांधींनी सत्ता सोडली तर ज्यांचा अधिकार व प्रभाव यांना धोका पोचणार होता असे संजय गांधी, राजेंद्र धवन, यशपाल कपूर, बन्सीलाल यांचे निक्षून सांगणे हे होते की, विरोधकांपुढे नमते घेणे लांच्छनास्पद होईल. तुम्हाला ग्रामीण जनतेचा व शेतकरी–कामगार यांचा मोठा पाठिंबा आहे; त्यामुळे विरोधकांच्या क्षणभंगुर वावटळीपुढे मान तुकविण्याची गरज नाही. या आपल्या म्हणण्याला साक्षात् पुरावा म्हणून त्यांनी दिल्लीच्या आसपासच्या प्रदेशातून शासकीय वाहनांनी निदर्शकांचे जथ्थे दिल्लीत आणले व 'देश की नेता इंदिरा गांधी' अशा घोषणांचा गदारोळ उठविला. तथापि, बिपनचंद्र यांचे म्हणणे आहे की, सगळी निदर्शने निखालस भाडोत्री होती, असे मानायला आधार नाही. भाकप व त्या पक्षाचे काँग्रेसमधील हस्तक यांनी तर विरोधकांची चळवळ व न्यायालयाचे निकाल हे उजव्या प्रतिगाम्यांचे कारस्थान आहे, असा धोशा लावला होता.

अशा व्याकूळ व बावरलेल्या मनस्थितीत २५ जून १९७५ च्या मध्यरात्री श्रीमती गांधींनी राष्ट्रपतींकरवी आणीबाणी घोषित केली. तसे करण्यापूर्वी श्रीमती गांधी यांनी मंत्रिमंडळ, मंत्रिमंडळाची राजकीय प्रश्नांविषयीची समिति, काँग्रेस कार्यकारिणी यापैकी कोणाचाही विचार घेतला नाही. विरोधी पक्षांच्या बहुतेक नेत्यांना त्यांनी अटकेत टाकलेच पण त्यांच्या काँग्रेस पक्षातीलही चंद्रशेखर, रामधन, मोहन धारिया इत्यादी मुखर व्यक्तींना तुरुंगात घातले. वृत्तपत्रांनी त्यांचे लेख व बातम्या सरकारी परीक्षकांकडून तपासून घेऊन त्यांच्या परवानगीनेच छापल्या पाहिजेत, असा हुकूम काढला. (त्यामुळे २६ जूनच्या अंकात अग्रलेखांची जागा वृत्तपत्रांनी कोरीच सोडून दिली.) घटनेने दिलेली नागरी स्वातंत्र्ये स्थगित केली. २६ तारखेच्या सकाळी पंतप्रधानांनी आकाशवाणीवरून भाषण करून इतके आश्वासन मात्र दिले की, ही असाधारण स्थिती लवकर संपवावी अशी त्यांची इच्छा आहे.

आणीबाणीत काय घडले याची चर्चा इथे करावयाची नाही. आणीबाणी कोणत्या परिस्थितीत व कोणत्या कारणांनी अवतरली त्याचाच विचार इथे करावयाचा आहे. आणीबाणीच्या उद्गाता ज्या इंदिरा गांधी त्यांना परिस्थितीचे काय आकलन झाले होते, ते इथवर सांगितले.

(५)

महत्त्वाच्या गोष्टीकडे पाहाण्याचे नजिकचा व सिंहावलोकनी असे दोन दृष्टिकोण संभवतात. नजिकचा दृष्टिकोण त्या घटनेचे तपशील, घटनेत गुंतलेल्या प्रमुख








व्यक्तींचे स्वभाव व हालचाली, त्यांच्याकडून झालेले डावपेच व चुका यांच्या अभ्यासावर भर देतो. ईजिप्तची राणी क्लिओपात्रा ही अप्रतिम सुंदर होती; व त्यामुळे सीझर, मार्क अँण्टनी असे धुरंधर रोमन राजपुरुष तिच्या प्रेमात पडले आणि तत्कालीन घटनांवर या प्रेमसंबंधांचा परिणाम घडला असे सांगतात. क्लिओपात्राचे नाक थोडे अपरे किंवा थोडे लांब असते तर इतिहास बदलला असता, असे म्हणतात त्याचे कारण हेच होय. सर्व समज नजिकच्या दृष्टिकोणाचा चांगला नमुना आहे. तथापि १९ व्या शतकापासून इतिहासकारांनी असा विचार मांडला की, भरपूर तपशील गोळा करून एखादी घटना खुलासेवार मांडता आली तरी इतिहासकाराने तेवढ्यावर समाधान मानू नये. इतिहासाला काही दिशा आहे व इतिहासाने ती दिशा स्वीकारण्यामागे काही प्रेरणा आहेत. त्या प्रेरणांच्या अनुषंगाने आपल्याला विवक्षित घटनेचा खुलासा करता आला पाहिजे.

आपण जर आणीबाणी ही घटना १२ जून १९७५ रोजी अलाहाबाद उच्च न्यायालयाने दिलेला निकाल आणि १७ जानेवारी १९७७ रोजी झालेली सार्वत्रिक निवडणुकांची घोषणा या दोन घडामोडींच्या चिमटीत पकडून तपासणार असू तर या घटनातील प्रमुख कर्ता ज्या इंदिरा गांधी त्यांच्या मानसिकतेचे विश्लेषण करणे महत्त्वाचे ठरेल व मागील भागात ते आपण केलेले आहे. तथापि आणीबाणी उलटून आता ३२ वर्षे झाली आहेत; त्यामुळे अधिक विस्तृत परिप्रेक्ष्यातून व व्यक्तींचे स्वभाव विशेष, आकांक्षा व राजकीय हालचाली यांचा तपशिलाने भारावलेला अभ्यास बाजूला ठेवून आपण आणीबाणीकडे पाहिले पाहिजे.

प्रा. बिपनचंद्र यांनी म्हटले आहे की, उच्च न्यायालयाच्या निर्णयाचा परिणाम म्हणून आणीबाणी पुकारण्यात आली, असे म्हणून चालणार नाही. जयप्रकाशांच्या नेतृत्वाखाली ७४ साली जी चळवळ सुरू झाली, तिचा विचार झाला पाहिजे. तसेच ७१ सालच्या निवडणुकीत काँग्रेस पक्षाला प्रचंड बहुमत मिळाले (आणि नंतर झालेल्या बांगलादेश-युद्धात जय मिळाल्याने श्रीमती गांधींचा दरारा व लोकप्रियता कळसाला पोचली) तरी काँग्रेस पक्षाला जयप्रकाशांच्या चळवळीपुढे राजकीय माघार स्वीकारावी लागली, शहरी पांढरपेशा वर्ग व वृत्तपत्रे यांनी त्या चळवळीला जो उत्साही पाठिंबा दिला, त्या मागची आर्थिक (व इतर कारणे) आपण शोधली पाहिजेत. या दोन्ही बाबींचे भरपूर तपशील बिपनचंद्र यांनी दिले आहेत. आपण इथे त्यांचा संक्षिप्त आढावा घेऊ.

एक्काहत्तरच्या निवडणुकीत इंदिरा गांधींना मिळालेल्या यशाचे प्रमुख कारण त्यांनी जो देखावा त्यावेळी निर्माण केला ते होते. त्यांनी लोकांना असे पटविले होते की, गरिबांना न्याय मिळावा यासाठी बरेच काही करण्याच्या प्रयत्नात आपण होतो. बँकांचे राष्ट्रीयीकरण, संस्थानिकांचे तनखे बंद करणे, खासगी उद्योगांवर निर्बंध लादणे अशा काही गोष्टी आम्ही केल्यादेखील. पण या प्रत्येक वेळी आपल्याला घटनेतील तरतुदी, स्वपक्षातील प्रतिगामी मंडळी, सर्वोच्च न्यायालयाची ताठर भूमिका अशा प्रतिकूल घटकांना तोंड द्यावे लागले. त्यामुळे आमची धोरणे ज्या तडफेने प्रत्यक्षात यायला हवी होती तशी आली नाहीत. आता तुम्ही मला भरपूर पाठिंबा द्या व सर्व प्रतिकूल शक्तींना चिरडून टाकता येईल इतके प्रचंड बहुमत आमच्या पक्षाला द्या. हे झाले म्हणजे मला घटना दुरुस्त करता येईल, गरिबांचा फायदा होईल असे कायदे करता येतील, देशात समाजवादी अर्थव्यवस्था निर्माण होईल, श्रीमती गांधी व त्यांच्या पक्षातील लोक यांनी समाजवाद व 'गरीबी हटाव' यांचे नारे अशा हिरिरीने लावले होते की, त्या जल्लोषात त्यांच्या पक्षाला लोकसभेत दोन तृतीयांश बहुमत मिळाले.

अशी समर्थ सत्ता हाती आल्यावर इंदिरा गांधींनी सकृद्दर्शनी समाजवादी वाटतील अशी अनेक पावले उचलली. खासगी उद्योगांवर चाप बसवण्यासाठी त्यांनी 'मॉनॉपली व रिस्ट्रिक्टेड ट्रेड प्रॅक्टिसेस ॲक्ट' नावाचा कायदा केला. सर्व साधारण विम्याचे राष्ट्रीयीकरण केले. 'फॉरेन एक्स्चेंज रेग्युलेशन ॲक्ट' पारित करून घेतला. रोजगार हमी योजना, शेतकऱ्यांना बँकांकडून कर्ज मिळण्याची सोय, स्वस्त धान्य दुकाने इत्यादी सोयी गरिबांना पुरविल्या. या प्रगतिपर योजनांना





न्यायालये जो अटकाव करीत ते दूर व्हावेत या उद्देशाने २५ वी घटना-दुरुस्ती करून राष्ट्रीयीकृत मालमत्तेसाठी शासन जी नुकसान-भरपाई देईल त्याला न्यायालय हरकत घेऊ शकणार नाही अशी तरतूद केली.

परंतु ७१ ते ७४ ही वर्षे देशाच्या अर्थव्यवस्थेला अतिशय वाईट गेली. बांगला देशाच्या युद्धामुळे व त्यापूर्वी आलेल्या निर्वासितांच्या लोंढ्यांमुळे सरकारवरील खर्चाचा बोजा फार वाढला. तुटीच्या अर्थकारणामुळे चलनवाढ होऊन महागाई अतिशय वाढली. त्यातच दोन वर्षे पाऊस तुटपुंजा पडला आणि अन्नधान्याचा तुटवडा वाढला. ७२ साली आंतरराष्ट्रीय बाजारात तेलाच्या किमती चढल्या. या आर्थिक संकटाला तोंड देण्यासाठी सरकारला कर वाढवावे लागले; इतकेच नव्हे तर पगारदारांवर सक्तीची बचतयोजना लादावी लागली. महागाई, अन्नधान्याची परवड, वाढते कर, सक्तीची बचत या योगाने शहरी मध्यमवर्ग डबघाईला आला.

या असंतोषाचे उद्रेकही दिसून येऊ लागले. मे १९७३ मध्ये उत्तर प्रदेशातील सशस्त्र पोलिसांनी बंड केले. ते शमवायला लष्कर आणावे लागले. त्या चकमकीत ३० जण मारले गेले. ७४ च्या मे मध्ये रेल्वे नोकरांचा संप झाला. समाजवादाच्या उद्घोषामुळे कामगारांच्या अपेक्षा वाढल्या होत्या. ऑगस्ट ७३ मध्ये लोको-कामगारांनी अचानक संप केला व भरमसाट मागण्या केल्या. रेल्वेमंत्री मिश्रा व कामगार मंत्री रघुनाथ रेड्डी यांनी शरणागती पत्करून या मागण्या मान्य केल्या. त्यामुळे इतर रेल्वे-कामगारांना स्फुरण चढले. या मागण्या मान्य केल्या असत्या तर रेल्वेवर दर वर्षी ४५० कोटी रूपयांचा बोजा पडला असता. खेरीज, सरकारी नोकरांच्या इतर गटांकडून पगार-वाढीची मागणी झाली असती व आणखी ९०० कोटी रूपयांचा भार सरकारवर पडला असता. त्यामुळे पंतप्रधानांनी हा संप निर्दयपणे चिरडून टाकायचे ठरविले. वीस दिवसानंतर कामगारांनी संप बिनशर्त मागे घेतला.

धर यांचे म्हणणे असे आहे की, श्रीमती गांधींनी आपल्या पुरोगामित्वाचा आणि समाजवादाचा रंगी-बेरंगी फुगा अशा आकर्षक आकारान्तपर्यंत फुगविला होता की, कॉंग्रेसमधील डावे आणि कम्युनिष्टांच्या प्रभावाखालील गट हुरळून गेले. त्यांनी पंतप्रधानांवर नाना प्रकारची दडपणे आणली व अर्थव्यवस्थेला अहितकारक अशी धोरणे ते सरकारच्या गळी उतरवू लागले. मोहन कुमारमंगलम् हे मूळचे भाकपचे ते कॉंग्रेसमध्ये आले आणि मंत्री झाले. १९७२ च्या विधानसभांच्या निवडणुकांपूर्वी त्यांनी श्रीमती गांधींना सुचविले की निवडणुका जिंकण्यासाठी टाटांच्या लोखंडाच्या कारखान्याचे राष्ट्रीयीकरण करावे! धर यांनी पंतप्रधानांना सांगितले की, हे घातक धोरण आहे; व बांगलादेश-युद्धामुळे मुळातच कॉंग्रेसपक्षाची लोकप्रियता इतकी वाढली आहे की, निवडणुकीसाठी अशा खेळ्या करण्याची गरज नाही. तथापि डाव्यांचा ससेमिरा इतका सतत पाठीशी लागला होता की, त्यांच्या आग्रहाखातर, सरकारने गव्हाच्या एकाधिकार खरेदीचा हुकूम काढला. पंतप्रधानांचे कार्यालय व योजना-मंडळ या दोन्ही संस्थांचा या धोरणाला विरोध होता. हे काम हाती घेऊ शकेल अशी यंत्रणा सरकारकडे नव्हती. हे धोरण घाईने अंमलात आणले व गहू खरेदीचा बोजवारा उडाल्यानंतर ते त्याहून धांदलीने सोडून देण्यात आले.

अशा ह्या अविचारी धरसोडीमुळे शहरी शिक्षित मध्यमवर्गीयांना जिकडे तिकडे भ्रष्टाचार दिसू लागला. भ्रष्टाचाराविरुद्ध पहिला उठाव गुजराथेत झाला. तेथील मुख्यमंत्री, कॉंग्रेसचे चिमणभाई पटेल, यांना विधानसभेच्या १६८ पैकी १४० आमदारांचा पाठिंबा होता. तथापि, चिमणभाई भ्रष्टाचारी आहेत, सबब त्यांनी राजीनामा दिला पाहिजे, यासाठी गुजराथमधील विद्यार्थ्यांनी 'नवनिर्माण समिती' स्थापन करून आंदोलन सुरू केले. डिसेंबर ७३ मध्ये सुरू झालेल्या या आंदोलनाच्या सत्रात अनेक दंगेधोपे झाले. ९५ माणसे मारली गेली. शेवटी ९ फेब्रुवारी १९७४ रोजी चिमणभाईंनी राजीनामा दिला. राष्ट्रपतींची राजवट लागू झाली; पण विधानसभा बरखास्त झाली नव्हती. ११ फेब्रुवारीला जयप्रकाश अहमदाबादेला गेले व त्यांनी विद्यार्थ्यांचे अभिनंदन केले. विधानसभेच्या बरखास्ती-साठी आंदोलन चालू ठेवण्याचा सल्ला त्यांनी आंदोलकांना दिला. ११ मार्चला, विधानसभा बरखास्त

करावी या मागणीसाठी, मुरारजींनी बेमुदत उपोषण सुरू केले. तेव्हा १६ मार्चला विधानसभा भंग करण्यात आली. पुढे नवनिर्माण आंदोलन विरून गेले. जून १९७५ मध्ये नव्याने निवडणुका झाल्या. योगायोगाने या निवडणुकींचा निकालही १२ जून १९७५ याच दिवशी लागला ! काँग्रेसचा पराभव झाला होता.

बिहारातील चळवळ जयप्रकाशांनी सुरू केली नव्हती. २१ जानेवारी १९७४ रोजी काँग्रेसेतर पक्षांनी महागाईच्या विरोधात एक दिवसाचा 'बंद' घडवून आणला. त्यानंतर १८ फेब्रुवारीला पाटणा विद्यापीठातील विद्यार्थिसंघटनेने बिहारमधील सर्व महाविद्यालयातील विद्यार्थि-प्रतिनिधींची एक परिषद, आता सर्वांस माहीत झालेल्या, लालूप्रसाद यादव यांच्या अध्यक्षतेखाली भरवली. या परिषदेत 'बिहार छात्र संघर्ष समिती'ची स्थापना झाली. विद्यार्थ्यांना ज्या जिन्नसांची गरज पडेल अशा वस्तूंच्या किंमती कमी कराव्यात, बेकारी दूर करावी, शिक्षण-शुल्क कमी करावे अशा स्वरूपाच्या मागण्या होत्या. बिपनचंद्र आवर्जून सांगतात की, या समितीवर रा. स्व. संघाच्या अखिल भारतीय विद्यार्थी परिषदेचा (अ.भा.वि.प.) पगडा होता. त्यामुळे डाव्या विचाराच्या संघटनांनी स्वतःचा 'बिहार छात्र नौजवान संघर्ष मोर्चा' स्थापन केला. पण हा 'मोर्चा' लवकरच अस्तंगत झाला. संघर्ष समितीची चळवळ मात्र फोफावतच गेली. मोर्चे, बंद, विधानभवनाला वेढा, राज्यपालांना घेराओ अशा कार्यक्रमांची बिहारात धामधूम माजून राहिली. पोलिसांनाही त्वेष चढला. लाठीमार, गोळीबार, 'मिसा'खाली होणाऱ्या अटका यांचा धुमाकूळ चालला. (लालूप्रसाद यांनी आपल्या कन्येचे नावच 'मिसा' ठेवले.) विरोधी पक्ष या चळवळीत उतरले. त्यांनी बिहारमधील सरकारने राजीनामा द्यावा; विधानसभा बरखास्त करावी अशी मागणी लावून धरली. ६ एप्रिल १९७४ रोजी विद्यार्थिनेते जयप्रकाशांना भेटले व त्यानंतर जयप्रकाशांनी या चळवळीचे नेतृत्व स्वीकारले.

जयप्रकाशांनी या चळवळीला आणखी व्यापक व मूलगामी रूप देण्याचा प्रयत्न केला. घटनेने घालून दिलेल्या प्रक्रियेतून अस्तित्वात आलेल्या सरकाराला समांतर असे जनता सरकार स्थापावे अशी त्यांची आकांक्षा होती. जयप्रकाशांच्या चळवळीतील राजकीय पक्षांचे ईप्सित मात्र असे होते की, आमदारांवर दडपणे आणून त्यांचे राजिनामे घ्यावेत, प्रस्थापित काँग्रेस सरकारला राजीनामा द्यायला भाग पाडावे, नवीन निवडणुका घ्याव्यात व त्यातून आपण सत्तेवर यावे. पण यापैकी फारच थोड्या गोष्टी प्रत्यक्षात आल्या. जयप्रकाशांच्या चळवळीला ग्रामीण भागातून पाठिंबा मिळेना. त्यामुळे गावोगावी जनता सरकारे स्थापण्याची योजना गाभटून गेली. काँग्रेसचे आमदार सोडाच पण विरोधी पक्षांचे आमदारही राजिनामे देईनात. जयप्रकाशांनी बिहार-चळवळीचे नेतृत्व घेताच भारतीय कम्युनिस्ट पक्ष, मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष आणि त्यांच्या कामगार संघटना यांनी चळवळीतून अंग काढून घेतले. जून १९७५ मध्ये चळवळ ओसरत चालली.

बिपनचंद्र यांनी जयप्रकाशांच्या चळवळीवर व जयप्रकाशांच्या नेतृत्वावर अतिशय कठोर टीका केली आहे. जयप्रकाशांच्या चळवळीत रा. स्व. संघ, जनसंघ आणि अ.भा.वि.प. यांचा मोठा भाग होता. रा. स्व. संघ ही फॅसिस्ट संघटना आहे. संघपरिवारातील घटकांनी चळवळ ताब्यात घेतली आणि एक मुखवटा म्हणून जयप्रकाशांचा उपयोग केला, हे बिपनचंद्रांच्या प्रतिपादनाचे मुख्य सूत्र आहे. त्या काळात इंदिरा गांधी, कम्युनिस्ट व त्यांचे काँग्रेसमधील हस्तक जयप्रकाशांवर हाच आरोप करीत. बिपनचंद्र म्हणतात की, आपल्या चळवळीतील ही मर्माची गोष्ट ओळखता न आल्यामुळे जयप्रकाश यांना, आणीबाणीचा अंमल झाल्यावर, 'माझे काय चुकले?' असा पश्चात्तापाचा उद्‌गार काढावा लागला. बिपनचंद्र सांगतात की, जयप्रकाशांना स्वार्थ साधायचा नव्हता व ते ध्येयवादी होते, हे खरे असले तरी राजकारणाची मर्मग्राही समज येण्यासाठी जी ध्येयदृष्टी असावी लागते, ती त्यांच्यापाशी नव्हती. ते म्हणतात, 'देशातील राजकीय व आर्थिक परिस्थिती आणि नेतृत्व, संघटना व स्वयंसेवक (काडर) यांची चळवळीतील भूमिका यांच्याविषयी जयप्रकाशांनी बांधलेली कल्पना अगदी उथळ व व्यक्ती सापेक्ष होती. त्यांच्या ठिकाणी संघटना बांधण्याचे, स्वयंसेवकदल उभारण्याचे कौशल्य

नव्हते. संघप्रचारक वगळता, जे संघटना उभारतील व स्वयंसेवक गोळा करतील असे कोणतेच नेते जयप्रकाशांपाशी नव्हते. संघटना व स्वयंसेवक नसताना केलेल्या संपूर्ण क्रांतीच्या पोकळ घोषणातून विनाशाखेरीज काहीच निष्पन्न होत नाही.'

पी. एन्. धर यांनीही जयप्रकाश व त्यांची चळवळ यांचा आणीबाणीची परिस्थिती निर्माण करण्यात मोठा हात होता, असे म्हटले आहे. आपण नीतिमूल्यांचे जतन करण्याचे व्रत घेतले आहे व आपण नीतिमत्तेच्या उत्कर्षासाठी लढतो आहोत असा अहंकार जयप्रकाश यांना झाला होता, असे धर सांगतात. आपल्यावर होणाऱ्या कोणत्याही टीकेची पर्वा ते करीत नसत. खरे तर त्यांची चळवळ उघड–उघड घटनाविरोधी होती आणि सरकारने त्यांना अगदी सुरुवातीलाच अटक करायला हवी होती. पण सरकारने या बाबतीत ढिलाई दाखविली. जयप्रकाश भ्रष्टाचाराबद्दल काँग्रेसवर टीका करीत त्यामुळे काँग्रेस पक्ष दिवसेंदिवस कोडगा बनत गेला. ज्यांच्यावर भ्रष्टाचाराचा आरोप होई ती माणसे इंदिरा गांधींच्या मनावर असे ठसवीत की, आपल्यावर होणारे आरोप म्हणजे इंदिरा गांधींवर झालेला हल्लाच आहे. त्यामुळे त्याही जयप्रकाशांवर उलटा आरोप करू लागल्या की, जयप्रकाशांची चळवळ ही फॅसिस्ट चळवळ असून तिला परकीय मदत मिळते आहे.

आणीबाणीचा अंमल सुरू झाल्यावर जयप्रकाश तीन महिने कैदेत होते. ते आजारी पडल्याने त्यांना सोडले. बंदीत असताना व सुटल्यावरही त्यांच्याशी बोलणी करण्याचा प्रयत्न, इंदिरा गांधींच्या संमतीने, धर यांनी चालू ठेवला होता. गांधीयत इन्स्टिट्यूट ऑफ स्टडीज्चे डॉ. दासगुप्ता व गांधी पीस फाऊंडेशनचे राधाकृष्ण हे मध्यस्थ होते. दासगुप्ता व राधाकृष्ण यांचा अभिप्राय असा होता की, श्रीमती गांधींनी जयप्रकाश यांना अधिक मान द्यावा, नेहरू व जयप्रकाश यांच्यातील जवळकीची जाणीव ठेवावी; नेहरूंनी गांधींनां जी गुरुतुल्य वागणूक दिली होती तसेच वर्तन श्रीमती गांधींनी आपल्याशी ठेवावे, अशी जयप्रकाशांची अपेक्षा होती. श्रीमती गांधींवर कम्युनिस्टांचा प्रभाव असून त्या सोव्हिएट युनियनला अनुकूल अशी धोरणे ठेवतात, असा जयप्रकाशांचा आरोप होता.

या सर्व गोष्टी मांडून धर असे सुचवितात की, श्रीमती गांधींनी कम्युनिस्ट व त्यांचे काँग्रेसमधील सहप्रवासी यांच्या प्रभावाखाली येऊन बेजबाबदार आर्थिक धोरणे राबविली; या धोरणांचे फलस्वरूप म्हणून महागाई वाढली, मध्यमवर्गीय व चाकरमाने भरडून निघाले; त्याने त्रासून जाऊन शहरी मध्यममार्गाने संप, घेराव, भ्रष्टाचारविरोधी असनदशीर आंदोलने यांचा अवलंब केला; गुजरात व बिहार येथे मोठ्या चळवळी उभ्या राहिल्या व तेथील निर्वाचित सरकारांची कोंडी झाली. श्रीमती गांधींचे राजकारण आक्रमक होते तर विरोधी पक्षांनी चालविलेल्या चळवळी घटनेची पायमल्ली करणाऱ्या आणि आक्रस्ताळी होत्या. या सर्व तापदायक घटनाक्रमाची परिणती (अंतर्गत) आणीबाणी पुकारण्यात झाली. बिपनचंद्र यांच्या म्हणण्याचा इत्यर्थ हाच आहे. पण ते जयप्रकाशांना अधिक दोष देतात. जयप्रकाशांच्या चळवळीत रा. स्व. संघाचा वाटा मोठा होता यावर भर देऊन जयप्रकाशांची चळवळ प्रतिगामी व फॅसिस्ट होती, असे सांगतात. त्याच वेळी ते असेही नोंदवितात की, आपण हे २००२ साली भाजपच्या राजवटीत लिहीत आहोत व त्या गोष्टीचा परिणाम आपल्या लिखाणावर झाला आहे.

(६)

आणीबाणी या प्रकरणाला १२ जून १९७५ रोजी आरंभ झाला असे धरून त्या प्रसंगाची छाननी केली असता आपल्याला काय सापडते ते आपण लेखाच्या सुरुवातीला पाहिले. आपणास असे आढळले की, श्रीमती गांधी अलाहाबाद उच्च न्यायालयाच्या निकालामुळे कोंडीत सापडल्या व आपण असुरक्षित आहोत या शंकेने व्याकूळ होऊन त्यांनी (अंतर्गत) आणीबाणी पुकारली. नंतर आपण या प्रकरणाचा प्रारंभ आणखी मागे, १९७२ सालापर्यंत नेला. तेव्हा आपल्या ध्यानी आले की, एका बाजूला काँग्रेसपक्षातील डावे व सहप्रवासी यांची दडपणे व दुसऱ्या बाजूला जयप्रकाशांच्या नेतृत्वाखाली चाललेली बहुशः शहरी

अनुक्रमणिका

मध्यमवर्ग, वृत्तपत्रे व विरोधी पक्ष यांची आक्रस्ताळी चळवळ या ओढाताणीमुळे पंतप्रधानांची मनोवस्था भांबावल्यासारखी झाली व त्यांनी आणीबाणीचा अध्यादेश काढला. श्रीमती गांधीच्या व्यक्तिमत्त्वा-इतकेच, प्रकरण समजून घेताना, जयप्रकाश यांचे व्यक्तिमत्त्वही तपासले पाहिजे, हेही ध्यानात आले.

परंतु अजूनही आपले विश्लेषण राजकीय रंगभूमीवरील प्रमुख पात्रांच्या व्यक्तिमत्त्वाचा वेध घेतच राहिले आहे. व्यक्तींची कार्यशैली व मनोवृत्ती याचा परिणाम राजकीय घडामोडींवर होतो, हे कोणीच नाकारत नाही. महाभारतात 'राजा कालस्य कारणम्' असा निवाडा देऊन व्यक्तीच्या वर्तनाचे महत्त्व पटविण्याचा प्रयत्न महाभारतकारांनी केला आहे. तथापि, प्रमुख व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वांच्या अभ्यासाचे महत्त्व लक्षात ठेवूनही काही ऐतिहासिक प्रवाहांची दिशा जाणून घेऊन आणीबाणीचा अधिक समाधानकारक खुलासा मिळतो का, ते पाहिले पाहिजे. या प्रवाहांचा काहीसा विचार धर यांनी केला आहे. त्याचा सारांश असा सांगता येईल.

घटनाकारांनी देशाला सार्वत्रिक मतदानाद्वारे प्रातिनिधिक शासन देण्याची तरतूद केली. या निर्णयाविषयीची साशंकता घटना-समितीतील अनेक धुरिणांनी व्यक्त केली होती. तथापि, भारतीय स्वातंत्र्य चळवळीने जी मूल्ये भारतीय जनतेत रुजविली होती ती अंकुरतील, वाढतील व देशातील लोकशाहीचा घेरेदार वृक्ष होईल अशा विश्वासाने घटनाकारांनी सार्वत्रिक मताधिकारावर आधारलेली लोकशाही अंगिकारिली. या विश्वासाला प्रतिकूल असे वातावरण आपल्या देशात होते. पहिले असे की, लोकशाही स्थिरावण्यासाठी देशाचा आर्थिक विकास होत राहील आणि समाजातील सर्व थरांना त्या विकासात सहभागी होता येईल, अशी व्यवस्था करावी लागते. पण आपल्याकडे बचतीचा व विकासाचा दर वर्षानुवर्षे अडीच टक्क्यांपेक्षा जास्त नव्हता. साहजिकच आपण खुंटून राहिलो आहोत अशी भावना पसरली होती. दुसरे, आपल्या घटनेने शासन इहवादी राहील असे गृहीत धरून शासनाची व्यवस्था लाविली होती. पण देशातील जनतेची धर्मावर दृढ श्रद्धा होती व ऐहिक उत्कर्षाला पारलौकिक श्रेयसाच्या तुलनेने गौण स्थान होते. तिसरे हे की, आपण व्यक्तीला मताधिकार दिला व असे धरून चाललो की, व्यक्ती वैयक्तिक व सार्वजनिक निर्णय आपल्या स्वतंत्र विचाराने घेईल. पण प्रत्यक्षात व्यक्तीही कुटुंबाची घटक असते; कुटुंब जातिबंधनात गुंतलेले असते. अशा व्यवस्थेत व्यक्ती स्वतःच्या विवेकाशी निष्ठा ठेवून आपले निर्णय घेईल असे मानणे म्हणजे पोकळ आदर्शवाद कुरवाळीत राहाण्याजोगे होते.

स्वातंत्र्याच्या चळवळीत विचार-स्वातंत्र्य, अभिव्यक्ति-स्वातंत्र्य इ. सप्त-स्वातंत्र्ये लोकांच्या अंगवळणी पडली. या स्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी चळवळीच्या नेत्यांनी कठोर शिक्षा भोगल्या. काँग्रेस सारख्या पक्षात लोकशाही प्रक्रिया बहुतांशी वापरली गेली. परंतु परकीय सरकारशी सतत चालू असलेल्या लढ्याच्या छायेत ह्या लोकशाही मूल्यांचा सुसंगत एकत्र व सकारात्मक प्रभाव लोकांच्या मनावर पडला नाही. त्यामुळे राजकारण याचा अर्थ सरकारशी लढा अशी खूणगाठ जनतेने बांधली. स्वातंत्र्य मिळून लोकशाही राज्यपद्धती सुरू झाल्यानंतरही लोकांनी व विरोधी पक्षांनी स्वातंत्र्य चळवळीत वापरलेले लढ्याचे मार्ग सोडून दिले नाहीत. मोर्चे, सत्याग्रह, हरताळ, धरणे ही स्वातंत्र्य लढ्यातील शस्त्रे परजलेली राहिलीच पण त्यात घेराव, सामुहिक उपोषण, नियमानुसार काम (वर्क्स टु रूल) अशी नवी शस्त्रे वापरात आली. धर यांचे म्हणजे असे आहे की, स्वातंत्र्यानंतर जे नेते सत्तेवर आले त्यांनी चळवळींच्या या प्रकारांना आळा घालायला हवा होता. पण सरकार वेळोवेळी अशा लढ्यांसमोर नमून वागले. या नेत्यांची पिढी अस्ताला गेल्यावर नंतरच्या राज्यकर्त्यांना ही घसरगुंडी थांबविता येईना. घटनाकारांनी घटनेच्या अंमलबजावणीसाठी संस्था निर्माण केल्या खऱ्या पण या संस्थात असे सामर्थ्य निर्माण झाले नाही की, त्या राज्यकर्त्यांना व विरोधकांना वचक बसवितील.

राज्यव्यवस्थेला अनुरूप अशी समाजाची धारणा असावी लागते. लोकशाहीची अंगे असणाऱ्या न्यायसंस्था, संसद, प्रशासन इ. संस्था परदेशातील





लोकशाही घटनांवरून आपण घेतल्या खऱ्या पण या संस्थात प्राण फुंकेल असा सविनय समाज (सिव्हिल सोसायटी) आपल्याकडे नव्हता. स्वातंत्र्य मिळवून देणारी पिढी अस्ताला गेल्यावर जे लोक राजकारणात पुढे आले, ते बहुधा जमिनदारी जीवनशैली अंगवळणी पडलेले लोक होते. 'जी हुजूर' या संस्कृतीला सरावलेले हे मंत्री, पक्षश्रेष्ठी, व कार्यकर्ते नेत्यांची खुशमस्करी करून आपली तुंबडी भरून घेऊ लागले. लोकशाही प्रक्रियांच्या संवर्धनाला अनुकूल असे आचार, विचार आणि मनोधारणा या नवीन राजकारण्यांच्या नव्हत्या. परिणाम असा झाला की, काही नेते "सर्वोच्च" पदाला पोचले आणि स्वतःला घटनेने घालून दिलेल्या निर्बंधांच्या पलिकडले समजू लागले.

परिस्थितीचा असा आढावा घेऊन धर असा निष्कर्ष काढतात की, लोकशाहीचा घाट व लोकशाहीचा आशय यांच्यातली दरी २५ जून १९७५ पूर्वीच इतकी रुंद झाली होती की, आणीबाणीचा अर्थ लोकशाही (म्हणजेच लोकांनी बनविलेल्या कायद्याचे राज्य) संपुष्टात येते असा केल्यास भारतात 'आणीबाणी' अनेक वर्षे होतीच; २५ जूनला 'पोपट मेला आहे' असे राजाच्या तोंडून वदवले गेले, इतकेच.

(७)

धर यांनी आणीबाणीची जी मीमांसा केली आहे, ती पटण्यासारखी नाही. आम्हास असे वाटत नाही की, जर समाज काही अटींना उतरत असेल तर तिथे लोकशाही नांदते; किंवा अशा काही अटी/निकष आहेत की ज्या समाजात लोकशाही नांदते तो समाज त्या अटी पुऱ्या करत असलाच पाहिजे. येथील इंग्रज सरकारही आपणास सांगत असे की, तुमच्या समाजात अमुक-अमुक सुधारणा करा म्हणजे तुम्ही स्वराज्याला पात्र व्हाल; आणि आपल्या नेत्यांना जेव्हा कळले की, अटींची ही यादी न संपणारी आहे तेव्हा त्यांना घोषणा करावी लागली की, 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे.' तीच गोष्ट लोकशाहीची आहे. धर आणि त्यांच्यासारखे अभिजनवादी असे सुचवीत आहेत की, येथील जनता लोकशाही राबविण्याला असमर्थ आहे. हा युक्तिवाद घातक आहे. कारण 'पाण्यात पडल्याखेरीज पोहता येत नाही' त्याच प्रमाणे लोकशाही राबवल्याखेरीज ती राबविण्याचे कौशल्य आत्मसात होत नाही. लोकशाही अंमलात आणताना साहजिकच अनेक अनपेक्षित अडचणी उपस्थित होणार व त्या अडचणींचा सामना करतानाच लोकशाही बळकट होत जाणार, हे स्पष्ट आहे. आणीबाणी पुकारली गेली तेव्हा लोकशाही राज्यशासनासमोर अशाच काही अडचणी विक्राळ रूपात उभ्या राहिल्या होत्या.

लोकशाही परिपक्व असली तरी देखील ती राबविणारे जे नेते असतात त्यांना व्यवस्थेशी दांडगाई करून आपली दांडगाई कुठपर्यंत खपून जाते याची चाचपणी करण्याचा मोह आवरत नाही. अमेरिकेचा राष्ट्राध्यक्ष निक्सन व वॉटरगेटचे किटाळ हा निक्सनने केलेल्या अशाच दांडगाईचा प्रकार होता. एकाहत्तर सालच्या निवडणुकीतल्या प्रचंड विजयानंतर श्रीमती गांधींनी अशी अनेक दांडगाईखोर कृत्ये केली. सर्वोच्च न्यायाधीशाची नेमणूक करताना ज्येष्ठताक्रम डावलणे हे अशा कृत्यांचे एक उदाहरण. दांडगाई खपून जाते हे जसजसे ध्यानात येत गेले तसतशी दांडगाई अधिकाधिक हेकेखोर व उर्मट रूप घेऊ लागली व आणीबाणीच्या जाहीरनाम्याने तिने सर्वात घोर रूप धारण केले. पण लोकशाही व्यवस्थेने श्रीमती गांधींना या कृत्यांची शिक्षा ७७ च्या निवडणुकीत त्यांचा सणसणीत पराभव करून दिली. एकाहत्तरच्या निवडणुकीतील पराभवानंतर व बांगलादेश युद्धात पाकिस्तानचा पराभव झाल्यानंतर भारतातील विरोधी पक्ष पुरते खचून गेले होते. पण ७१ पासून ७४ पर्यंत जी आर्थिक दुरवस्था निर्माण झाली आणि शहरी चाकरमान्या वर्ग महागाईने कावून गेला त्यामुळे गुजरातेतील विद्यार्थ्यांनी व बिहारातील विद्यार्थ्यांनी राज्यसरकारे बरखास्त करावीत या चळवळी केल्या. त्यापासून उभारी घेऊन विरोधी पक्ष पुढे सरसावले. तेही या चळवळीत सामील झाले. या चळवळी घटनाबाह्य म्हणजेच व्यवस्थेशी दांडगाई करणाऱ्या होत्या. गुजराथेत यश मिळाल्यानंतर दांडगाई तीव्र होत गेली आणि अलाहाबाद उच्च न्यायालयाचा इंदिरा गांधींच्या विरोधात गेलेला निकाल आणि नंतर सर्वोच्च न्यायालयाने दिलेली सशर्त स्थगिती यांचा

अनुक्रमणिका

कमाल फायदा घेण्यासाठी विरोधी पक्षांनी आपली दांडगाई चरम सीमेला पोचविली. तेव्हा व्यवस्थेने आणीबाणीचा दंड उचलून ही चळवळ नेस्तनाबूत केली.

इथे हे लक्षात घेतले पाहिजे की आपण सामान्य नागरिक देखील व्यवस्थेशी वारंवार दांडगाई करतच असतो. वर वर्णिलेल्या दांडगाईच्या मानाने ही दांडगाई अगदीच किरकोळ असते, इतकेच. आपणही परवाना नसताना सार्वजनिक रस्त्यांवरून वाहन चालवितो, कधी कधी तिकिटाविना प्रवास करतो, बेकायदेशीरपणे रस्त्यावर भाजी विकणाऱ्याकडून भाजी घेतो. केव्हा केव्हा अशा दांडगाईची बढाई देखील मारतो.

तथापि, ह्या घनघोर चळवळी झाल्या; त्यांना व्यवस्थेने इंदिरा गांधींच्या नेतृत्वाखाली तितकेच आक्रस्ताळी उत्तर दिले; या सगळ्याच्या तळाशी काही प्रचंड आर्थिक कारणे असली पाहिजेत. त्यांचा शोध बिपनचंद्र किंवा धर, राजेश्वर राव (भाकप) यांनी नीटपणे घेतलेला नाही. आम्हास असे वाटते की, आर्थिक विकासाचे जे प्रारूप (मॉडेल) जवाहरलाल नेहरू यांनी कल्पिले होते व ज्याला सार्वत्रिक मान्यता मिळाली होती, त्या प्रारूपाच्या मर्यादा साठीच्या दशकाच्या उत्तरार्धात लोकांना जाणवू लागल्या होत्या. कितीही आर्थिक गुंतवणूक केली तरी विकासाचा दर अडीच टक्क्याच्या वर जात नाही; दारिद्र्य रेषेखालील लोकांची संख्या कमी होत नाही; निरक्षरता निर्मूलन, संतति नियमन, आरोग्यसेवा इत्यादी लोककल्याणकारी योजनांना गती येत नाही, हे जाणकारांच्या ध्यानात येत होते. त्यामुळे त्या प्रारूपांची ओढाताण सुरू झाली. भाकप व त्यांचे सहयात्री अर्थव्यवस्थेत अधिक सरकारी हस्तक्षेप असावा असा आग्रह धरू लागले; तर दुसऱ्या बाजूने उद्योगपती, त्यांचे सल्लागार असणारे अर्थशास्त्रज्ञ, त्यांच्या मालकीची वृत्तपत्रे सरकारी हस्तक्षेप कमी झाला पाहिजे, खासगी क्षेत्राला अधिक मोकळेपणा दिला पाहिजे, अशी मागणी करत होते. पंतप्रधानांच्या धोरणांवर नाराज होऊन ७१ ते ७४ या चार वर्षांत खासगी क्षेत्रात फारच थोडी गुंतवणूक भांडवलदारांनी केली.

जवाहरलाल नेहरूंच्या मिश्र अर्थव्यवस्थेचे मुख्य तत्त्व हे होते की, खासगी क्षेत्राकडून कर वसूल करावयाचा व तो पैसा सरकारी कामासाठी वापरायचा. पण खासगी क्षेत्र दुर्बल होत गेले व सरकारी क्षेत्रातून होणारे उत्पन्न नगण्यच राहिले, तर आर्थिक संकट ओढवणे अटळ होते. सत्तर सालानंतर हीच परिस्थिती आली. दुष्काळ, निर्वासित, बांगला-देशाची लढाई यामुळे आर्थिक संकट गडद होत गेले. मार्क्सवादी अर्थकारणी, भाकप व त्यांचे सहप्रवासी यांच्या प्रभावाखाली येऊन पंतप्रधानांनी एकाधिकार गहू खरेदीचा उपक्रम केला, पण तो फसला.

आणीबाणी पुकारताना श्रीमती गांधींच्या अपेक्षा व आकांक्षा काय असतील त्या असोत, पण आणीबाणीचा उपयोग करून त्यांनी सरकारवर असलेली भाकप व सहप्रवासी यांची पकड झुगारून दिली ही इतिहासाची साक्ष आहे. श्रीमती गांधींनी घटनेच्या प्रस्तावनेत (प्रिॲम्बल) समाजवाद हा शब्द घातला खरा पण आर्थिक धोरणातून त्या शब्दाची हकालपट्टी केली.

**आधारग्रंथ :**

१) इन् द नेम ऑफ डेमॉक्रसी : जेपी मुव्हमेंट ॲण्ड इमर्जन्सी - बिपनचंद्र. पेंग्विन बुक्स इंडिया, न्यू देल्ही २००३.

२) इंदिरा गांधी दी इमर्जन्सी ॲण्ड इंडियन डेमॉक्रसी - पी. एन्. धर. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, न्यू देल्ही २०००.

३) इंदिरा गांधी : द लाईफ ऑफ इंदिरा नेहरू - - गांधी - कॅमेरीन फ्रँक, न्यू देल्ही २००१.

४) द जजमेंट – कुलदीप नायर. विकास पब्लिशिंग हाऊस. न्यू देल्ही १९७७.








# ईश्वर आणि ईश्वरीय

## साक्षीदास

'नवभारत' मार्च २००९ च्या अंकांत श्री आचार्य विवेक गोखले यांचा 'विवेकवाद: पुनर्विचार' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखात त्यांनी विवेकवाद, ईश्वर, ईश्वरीय वचने इत्यादींवर उहापोह केला आहे.

ह्या लेखात श्री. गोखले यांनी जी. अी. मूर यांचे म्हणणे दिले आहे. (पान १३) यावरून श्री. गोखले यांनी इंग्रजी ग्रंथ वाचले आहेत हे समजते. पण श्री. गोखले यांनी ईश्वर, ईश्वरीय वचने यांबाबत भारतीय उपनिषदे वाचली आहेत की नाहीत ते समजत नाही.

ईश्वर, ईश्वरीय वचने याबाबतीत उपनिषदांचे म्हणणे समजावून सांगताना ओशोंनी म्हटले आहे की, "ऋषी असं नाही म्हणत की, ईश्वराची परिकल्पना उपयोगी आहे. ऋषी असंसुद्धा म्हणत नाही की, ईश्वर आहे. ऋषी म्हणतो की जे आहे त्याचे नाव ईश्वर आहे. ऋषी असं सुद्धा म्हणत नाही की 'ईश्वर आहे', कारण ज्या कोणाला आम्ही म्हणू 'आहे', ते 'नाही आहे' असेसुद्धा होऊ शकते. आम्ही म्हणतो की वृक्ष आहे, उद्या तो नाहीसा होईल. आम्ही म्हणतो की नदी आहे, उद्या ती सुकून जाईल. आम्ही म्हणतो, तारुण्य आहे, उद्या म्हातारपण येईल. आम्ही म्हणतो, सौंदर्य आहे, उद्या कुरूप होऊन जाऊ. जे जे आहे ते नाहीसे होण्याची सम्भावना स्वत:मध्ये राखूनच असते. म्हणूनच ऋषी असं सुद्धा म्हणत नाही की, ईश्वर आहे. तो नाही म्हणत की 'गॉड एक्जिस्टस्.' तो म्हणतो की, जे आहे, त्याचं नाव ईश्वर आहे. 'दॅट विच एक्जिस्टस् इज गॉड'. जे आहे, त्याचे नाव ईश्वर. आणखी मोठी गोष्ट झाली. ह्याचा अर्थ असा झाला की, ईश्वर अर्थात अस्तित्व. ईश्वर म्हणजे असणे. जे काही आहे ते ईश्वर आहे. ईश्वर ही काही इतर वस्तूंप्रमाणे एक वस्तू नाही. ईश्वर हा असण्याचा गुण आहे. म्हणूनच, ऋषी म्हणेल की, 'ईश्वर आहे' असे म्हणणे कठीण आहे, पुनरुक्ती आहे, रिपीटिशन आहे. कारण, ईश्वराचा मतलब आहे 'आहे', आणि आहेचा मतलबसुद्धा आहे, ईश्वर."

ओशोंनी, भगवान श्री रजनीश यांनी, हे प्रवचन १९७१ साली दिले आहे. आणि हे प्रवचन पुस्तकरूपाने १९७१ साली प्रसिद्ध झाले. तरीसुद्धा आता २००९ साली, तीस वर्षांनंतरसुद्धा, 'नवभारत' मार्च २००९ च्या अंकात आचार्य विवेक गोखले यांनी 'ईश्वर' यावर काथ्याकूट करणे सुरूच ठेवले आहे. कपाळ ठोकून घेण्याची वेळ आली. एक वेळ श्री. गोखले यांनी १९७९ साली, किंवा नंतरही १९७९ सालचा, हा ग्रंथ वाचला नसेल. पण न वाचणे हासुद्धा प्रमाद झाला – पण त्यापूर्वी उपलब्ध असलेले निर्वाण उपनिषद वाचून मग सांप्रतचा लेख लिहायला घ्या. पण लक्षात कोण घेतो? इंग्रजी बुक वाचले की 'तेणे मुक्ति चारी साधीयेल्या'. मग 'देवाचिये द्वारी उभा क्षणभरी' हवे कशाला? कारण देवाचिये द्वारी उभे राहणे म्हणजे जे 'आहे' त्याच्या द्वारी उभे राहणे आले. मग कुरूप तर कुरूप, सुंदर तर सुंदर, स्पृश्य तर स्पृश्य, गाढव तर गाढव - सर्वच 'आहे', सर्वच ईश्वर आहे. असे वागणे - लिहिणे नव्हे - वागणे कठीण. फार फार कठीण. शेकडो वर्षांनंतर एखादा एकनाथ तसा वागतो, त्यानंतर शेकडो वर्षांनंतर एखादा गाडगेबाबा तसे वागतो. तुम्ही आम्ही फक्त म्हणणार 'ईश्वराला रिटायर करा'. तसे रिटायर केले म्हणजे चंगळवाद करायला 'चारही राने' मोकळी.

आचार्य विवेक गोखले यांनी त्यांच्या लेखात 'ईश्वरीय वचने' यांचा प्रतिवादापुरता उल्लेख केला आहे; त्या शब्दांच्या अर्थाची उकल करून दाखवली नाही. ती उकल व्हावी म्हणून ओशो यांच्या प्रवचनातील अंश देत आहे.

अनुक्रमणिका

"यासाठी एक फार मजेशीर गोष्ट, आणि फार विचित्र, आणि ज्यामुळे मोठा विवाद जगात चालला आहे, ती आपणास ह्या संदर्भात सांगतो. हिंदू मानतात की वेद ईश्वरीय वचन आहेत. इस्लाम मानतात की कुराण इलहाम आहे, रिविलेशन आहे, ईश्वराकडून सरळ प्रगट झाले आहे. ईसाईसुद्धा मानतात की बायबल ईश्वरीय, रूहानी ग्रंथ आहे. परंतु, यापैकी कोणीही ठीकपणे सिद्ध करत नाही की याचा अर्थ काय आहे? आणि जो कोणी सिद्ध करू पाहतो, तो फार पोरकटपणाच्या गोष्टी बोलत राहतो. त्यांना चूक ठरवणे फारसे कठीण जात नाही.

"जे म्हणतात की वेद ईश्वरीय ग्रंथ आहेत, त्यांना चुकीचे ठरवणे फार कठीण काम नाही. कारण वेदांमध्ये ज्या काही गोष्टी आहेत, त्या अगदी मानवी आहेत आणि माणसाचे वक्तव्य वाटतात. कुराणातसुद्धा ज्या गोष्टी आहेत, त्यासुद्धा मानवी आहेत, आणि माणसाचे वक्तव्य असल्यासारख्या वाटतात. अत्यंत बुद्धिमत्तापूर्ण, परंतु तरीदेखील माणसाचे वक्तव्य. आणि बायबलमध्ये सुद्धा तोच प्रकार आहे. कोणतेही, एकसुद्धा वचन असे नाही की जे माणसाला सुचणार नाही. कोणतेही वचन माणूस सांगू शकतो. कोणतेही वचन असे नाही आहे की जे वाटेल की ते ईश्वरीय आहे.

"अत्यंत बुद्धिमान लोकांची वचने आहेत ती, श्रेष्ठतम प्रतिभावंतांची वचने आहेत ती, पण ईश्वरीय असण्याचे कोणतेही कारण वाटत नाही. म्हणून जो ह्या वचनांच्या विरोधी बोलतो तो सरळपणे बोलू शकतो. पण ईश्वरीय मानण्याचे कारण दुसरे आहे, ते ह्या सूत्रामध्ये आहे.

"ह्या जगाच्या मौलिक आधारासंबंधी जे काही वक्तव्य आहे, ते वक्तव्य ह्या जगाच्या मूळ आधारापासूनच येऊ शकते. दुसऱ्या कोणाच्या द्वारा नाही दिले जाऊ शकत. आणि जर दुसरा ते वक्तव्य देईल तर ते वक्तव्य मिथ्या असेल,

फाल्स असेल.

"हे जगच आपल्या संबंधात स्वतःचे वक्तव्य आहे. ईश्वरच जर सांगेल, तरच ते सार्थक असेल. समुद्रच जर सांगेल की मी असा आहे, तर मग ठीक आहे. कितीही मोठी लाट समुद्राच्या संबंधी काहीही सांगो, ते सांगणे अर्धवट असेल, आणि लाटेचेच असेल.

"हा वेद आणि बायबल, कुराण यांचा जो आग्रह आहे की ही वचने ईश्वरीय आहेत, याचे कारण काय? याचे कारण असे आहे की ह्या वचनांना मानून जो कोणी यात्रा करतो, त्याचे लाट असणे एके दिवशी नष्ट होते आणि समुद्र होणे घडते. ह्या वचनांना (शिरोधार्य) मानून जो कोणी यात्रेला निघतो, तो स्वतःच एके दिवशी संपतो आणि अखेर ईश्वरच उरतो.

"ज्या लोकांनी ह्या वचनांना ईश्वरीय म्हटले, त्यांच्या म्हणण्याचे प्रयोजन एवढेच होते की ह्या वचनांना मानून जर कोणी चालायला सुरुवात केली, तर शेवटी मनुष्य आणि मनुष्यता यांच्या सीमेपलिकडे तो जाऊन पोचेल. आणि ज्या क्षणी ह्या वचनांची अखेरची पायरी उपलब्ध होते, त्या क्षणी व्यक्ती स्वतःसुद्धा शिल्लक उरत नाही, – बिंदू हरवतो, समुद्रच शेवटी उरतो. (अहंकार नष्ट होतो, निरहंकारी होतो, अस्तित्व उरते.) म्हणून ज्या वचनांना मानून शेवटी बिंदू विरून जातो, आणि समुद्रच उरतो, ती वचनं बिंदूची असू शकत नाहीत. ती वचने समुद्राचीच असणार, कारण बिंदू जाणणार तरी कसा?

"परंतु आमची अडचण होते. आम्ही जेव्हा कुराण किंवा बायबल किंवा वेद वाचतो, तेव्हा आम्ही जसे आहोत, तसेच राहून वाचायला सुरुवात करतो - कोणतीही यात्रा चालायला सुरुवात केल्याशिवायच. आम्ही आमच्या आराम-खुर्चीवर बसून वेद वाचतो. कोणतेही रूपांतरण केल्याशिवाय, जीवनात बदल केल्याशिवाय, कोणत्याही अल्केमीमधून गेल्याशिवाय आमच्या ओबडधोबड दगडाला हिरा बनवल्याशिवाय, आम्ही जसे आहोत तसेच राहून वेद वाचले, कुराण वाचले, बायबल वाचले,- ती वचने आम्हाला मनुष्याचीच वचने आहेत असे वाटणार. कारण आम्ही तेच वाचतो, ज्याची आमची क्षमता असते. ज्यासाठी आमची क्षमता नसते, ते आमच्या आकलनाच्या बाहेर

अनुक्रमणिका






राहते.

"आम्ही जो अर्थ काढतो - तो काढतो कमी, भर जास्त घालतो. जेव्हा केव्हा आम्ही वेद वाचतो, तेव्हा आम्ही वेद वाचत नाही, वेदांच्या द्वारा आम्ही स्वतःलाच वाचत असतो. म्हणून आम्ही जसे असतो, तसाच अर्थ निघतो. जेव्हा आमच्यात बदल घडतो आणि वेद वाचतो, तेव्हा जो अर्थ लागतो तो दुसराच असतो. आणि जेव्हा आम्ही स्वतः त्या स्थानावर पोचतो, जेव्हा व्यक्तीचा अहंकार गळून पडतो आणि परमात्माच फक्त उरतो, तेव्हा जो अर्थ लागतो, तो दुसराच अर्थ असतो.

"ज्यांनी ध्यानाच्या ह्या सात पायऱ्या पूर्ण केल्या आहेत, त्यांनी जाणले आहे की, ही जी वचने कुराणात आहेत, महमंदाची नाही आहेत. त्यांनी जाणले आहे की ही जी वचने वेदांमध्ये आहेत ती ऋषींची नाहीत. त्यांनी जाणले आहे की ही जी वचने बायबलमध्ये आहेत, त्यांचा मनुष्यासी कोणताही संबंध नाही. ही वचने मनुष्याच्या पलिकडची आहेत. परंतु मनुष्याच्या पलिकडून तेव्हांच येतात जेव्हां मनुष्य स्वतः मिटतो आणि दार व्हायला तयार होतो.

"ख्रिश्चन फकीर तर्तूलियनने म्हटले आहे की, 'मी ईश्वराला मानतो, कारण ईश्वर असंभव आहे.' त्याचे भक्त त्याला म्हणाले, 'आपले डोके ठिकाणावर आहे का?' तर्तूलियन म्हणाला, 'जर ईश्वर संभव असेल तर माझ्या मानण्याची गरजच काही उरली नाही. सूर्याला मी मानत नाही, कारण सूर्य संभव आहे. आकाशाला मी मानत नाही, कारण आकाश आहे. मी ईश्वराला मानतो, कारण ईश्वर असणे बुद्धीला असंभव वाटते, इम्पॉसिबल वाटते.'

"आपली जेव्हा बुद्धी एखाद्या असंभवाला मानते, तेव्हा बुद्धी तुटते आणि शून्य होते. असंभवाला टकरावून नष्ट होते बुद्धी. असंभवाला टकरावून विचार गळून पडतात. असंभवाचा स्वीकार केल्याबरोबर अहंकाराला उभे राहायला जागा नाही मिळत. आता असंभवाची गोष्ट सुरू होते. तुम्ही हे फार वेळा गीतेमध्ये वाचले असेल आणि तुमच्या ध्यानात नसेल आले की असंभव असते."

"ईश्वर याचा अर्थ – द टोटॅलिटी. ह्या संपूर्ण अस्तित्वाचे धार्मिक नाव ईश्वर असे आहे. विज्ञान ज्याला एक्जिस्टेंस म्हणते, अस्तित्व म्हणते, प्रकृती म्हणते, धर्म त्यालाच परमात्मा म्हणतो."

अहंकारशून्यतेची खूण मे. पुं. रेगे ह्यांनी नेमकी हेरली होती. 'गीताचिकित्सा' ह्या भाऊ धर्माधिकारी यांच्या ग्रंथाला मे. पुं. रेगे यांनी प्रास्ताविक लिहिले आहे. त्यात त्यांनी म्हटले आहे की, "पण अशा कोणत्याही विशिष्ट मताला अनुसरणारी मोक्षसाधना जर घेतली तर तिचे आपल्या प्रत्यक्ष जीवनात आपण सिद्ध करू शकू असे जे साध्य असते ते इतर कोणत्याही दार्शनिक मतावर आधारलेल्या मोक्षसाधनेच्या अशा साध्यासारखे असते; आणि ते म्हणजे ज्याच्यात अहंभावाचा पूर्ण लोप झाला आहे, आणि साधारण धर्मांचा परिपूर्ण उत्कर्ष झाला आहे. त्यांच्या पारमिता गाठण्यात आल्या आहेत असे मन."

अहंकारशून्य मनुष्य म्हणजेच ईश्वर, आणि अशा अहंकारशून्य मनुष्याची वचने म्हणजेच ईश्वरीय वचने.

अनुक्रमणिका

# शाल्मली : एक दिल सौ अफसाने

## देवीदास बागुल

एक कोरा कागद घ्या. आणि त्यावर एक उभी रेघ काढा. बिचकू नका. रेघ सरळ नाही आली तरी चालेल. हां, हे झालं झाडाचं खोड. आता रेघेच्या मध्यापासून वरच्या भागात तीनचार, चारपाच ठिकाणी आडव्या रेघा काढा. ह्या झाल्या फांद्या. आता तांबडी पेन्सील घ्या आणि ह्या फांद्यांवर तांबडे ठिपके काढा. चांगले ठसठशीत ठिपके काढा. झकास! आता हाताच्या अंतरावरून हे चित्र पहा. कसं सुंदर झाड दिसतं ना! काय हसताय वाटतं? मला की झाडाला? माझं सोडा. पण झाड खरंच सुंदर दिसतं. काय म्हणता, असं बिनपानांचं आणि तांबड्या ठिपक्यांचं झाड कुठं असंतं तरी का? असतं. नव्हे, आहे. खोटं वाटत असेल तर ग्रीष्म ऋतूलाच विचारा ना. आणि अगदी प्रत्यक्ष खात्रीच करून घ्यायची असेल तर, मे-जूनच्या सुमारास त्या झाडालाच गाठा. तेव्हा तुम्ही म्हणाल की, अरे हे तर आपलं काटेसावरीचं झाड! काटेसावर म्हणा, किंवा शाल्मली म्हणा, पण झाड कसं आहे? भपकेबाज असेल, पण देखणं आहे की नाही! खरं म्हणजे सुंदरच आहे. सुंदर म्हणजे नेहमीचं गोडगोड सुंदर नव्हे. पण वेगळं सुंदर. जणूकाही काल्पनिकच आहे असं वाटायला लावणारं हे झाड खरंखुरं वाटतच नाही. राखट मळकट खोडाला काटेरी फांद्या आणि त्यावर ही गेंदेदार तांबडी भडक फुलं. पानांचा मात्र अजिबात पत्ता नाही. एकेक फूल हाताच्या मुळीएवढं. दणकट. 'अस्सं झाड सुरेख बाई उन्हाळ्यात पहावं.' आणि तिन्ही त्रिकाळ पहावं. सकाळी पहावं, दुपारी पहावं आणि संध्याकाळीसुद्धा पहावं.

सकाळी पहावं तर त्या फुलांचा तांबडा रंग हळूहळू भरत जातो. उषःकालच्या लुसलुशीत तांबड्या प्रकाशात शाल्मलीची तांबडी फुलं गोजिरवाणी दिसतात. हळूहळू कोवळा सूर्यप्रकाश उजळत उजळत गिरीशिखरांवर आणि झाडांच्या शेंड्यांवर उतरतो. तो पिवळा प्रकाश जसजसा प्रखर होतो तसतसा सृष्टीतल्या वस्तूंना रूपेरी कडा मिळतात. रंगीत वस्तू तर अधिकच तेजस्वी दिसतात. शाल्मलीची तांबडी फुलंसुद्धा तेजाळतात. त्या फुलांवर सकाळचा तो भरजरी पिवळा प्रकाश तांबड्या रंगाच्या अलवार छटा उमटवू लागतो - सोनेरी, नारिंगी, बैंगनी, अंजिरी, कुसुंबी!

दुपारी उन्हं जेव्हा तापून उठतात, तेव्हा प्रकाश कडक आणि पांढरा भगभगीत होतो. डोळ्याला भोवळ येते. पण शाल्मली मात्र आपल्या तांबड्या फुलांना मिरवू लागतो. तांबडे पेरवे पलितेच जणू त्याच्या फांद्याफांद्यांवर भडकू लागतात. सगळ्या जगाला दिपवणारे ते तांबडे निखारे अद्‌भुत वाटतात. प्रखर आणि सुंदर!

आणि हेच झाड नंतर संध्याकाळी पहा. मावळतीवर उन्हं कललेली असतात. भगभगीत प्रकाश मंदमंद होत जातो. त्या मवाळ लडिवाळ प्रकाशात हे झाड आपल्या नितळ तांबड्या फुलांनी जणू काही दीपज्योती लावते आहे असं वाटतं. केवढी मोठी समई ही! मग हळूच म्हणा की, 'दिव्या दिव्या नमस्कार!'

रंगांच्या कल्लोळासाठी हे झाड सकाळी पाह्यलं तसं आणखी एका वेगळ्या रंगमेळाव्यासाठी हेच झाड पुन्हा एकदा सकाळी पहावे. सकाळच्या रामप्रहरी अवघे द्विजगण ह्या झाडाच्या अंगाखांद्यावर गोळा होतात. मैना, फुलचुकी, बुलबल, साळुंक्या, चिमण्या आणि आपले कावळेकाकासुद्धा. कशाला? तर रसपानासाठी. अगदी शुद्ध रसपानासाठी. तांबड्या फुलातला रस प्यायला ही पक्षीमंडळी बिनबोभाटपणे जमलेली पाहून झाडाला आणखी एक रंगबिरंगी साज मिळतो.

अनुक्रमणिका

हे तांबडं झाड नुसतं सुंदर दिसतं असं नव्हे, तर त्या एकाच वेळी ते सुंदर ऐकूही येते. रसपान चालू असताना त्या वेगवेगळ्या पक्ष्यांचे तऱ्हेतऱ्हेचे कोमल, शुद्ध, तीव्र स्वर चालू असतात. तो स्वरमेळ एखादा तराणा चालू असल्यासारखा वाटतो.

हे झाड जसं पक्ष्यांना लळा लावतं, तसंच ते लहान मुलांनाही खेळायला बोलावतं. ह्याची फळं पिकली म्हणजे आतल्या रुईच्या भारानं फुटतात. त्यातून पांढऱ्याशुभ्र केसांच्या 'म्हाताऱ्या' बाहेर पडतात. त्या हलक्याझुळक्या म्हाताऱ्या वाऱ्यावर तरंगत तरंगत खाली जमिनीकडे उतरू लागल्या म्हणजे लहानसहान पोरंसोरं त्यांना पकडण्यासाठी धाव घेतात. पण ह्या म्हाताऱ्या मुलांपेक्षा अधिक चपळ आणि चंचल. वाऱ्याची इटुकली झुळूक आली की त्या म्हाताऱ्या इकडेतिकडे सैरभैर होतात. मुलांची तारांबळ उडते. मुलं आपल्यापासून दूर जाताहेत हे पाहून हा शाल्मली नव्या म्हाताऱ्या करून सोडतो. दूर भरकटणाऱ्या म्हाताऱ्यांचा नाद सोडून मुलं झाडाकडे झेपावतात. मुलांशी शिवाशिवीचा हा खेळ खेळणारं हे थोराड झाड त्यावेळी लहानात लहानांहूनही लहान होतं. म्हणूनच ते सुंदर दिसतं.

ह्या सुंदर फुलाचं अंतरंग बघावं म्हणून एक फूल हातात घेतलं. आत खोलवर एका देठावर पाच पुंकेसरांची चांदणी चमचमत होती. आणि तिच्या भोवताली काळ्या ठिपक्यांच्या पुंकेसरांचे वर्तुळ थरथरत होते. रुंद रक्तवर्णी पाच पाकळ्यांना तोलून धरणारी ती पंचशील चांदणी आणि त्या चांदणीभोवती परकरासारखी काळ्या ठिपक्यांची मखरण - बाहेरचं सगळं जग विसरायला लावणारी होती; शाल्मली होती, शाल्मली करणारी होती.

❧ ❧ ❧

---



अनुक्रमणिका

# लेखकांचा परिचय



**प्रा. रत्नाकर बापूराव मंचरकर**

मराठीचे सेवानिवृत्त अध्यापक, मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक, साहित्य, शिक्षण आणि समाज यांवर वैविध्यपूर्ण लेखन, संपादन व शोध निबंध, लेखनाबद्दल राज्य पुरस्काराने सन्मानित.

***पत्ता :*** श्री स्वामी समर्थ, १९, नंदनवन कॉलनी, कोहिनूर मंगल कार्यालयासमोर, सावेडी, अहमदनगर - ४१४ ००३.



**श्री. देवीदास बागुल**

मराठी साहित्याचे व्यासंगी अभ्यागत व लेखक; ललित कलांचे जाणकार समीक्षक; नामवंत व छायाचित्रकार; पुस्तकांची मुखपृष्ठे व मजकूर यांच्या मांडणीच्या विषयात वैशिष्ट्यपूर्ण कार्य.

***पत्ता :*** ६५/२०, एरंडवणे, कृपांजली, पुणे - ४११ ००४.



**श्री. बाबूराव चंदावार**

समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक

***पत्ता :*** सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.




अनुक्रमणिका

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता'ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहातील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत'कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता'चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही ते यथाकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



अनुक्रमणिका

